# प्रस्तावना : २०१० ची इंग्रजी आवृत्ती

भारत चमकतोय. आंतरराष्ट्रीय नाणेनिधी ने ऑक्टोबर २०१० मध्ये भारताच्या आर्थिक वाढीचा अंदाज २०१० ह्या वर्षासाठी वाढवून ९.७% वर्तवला होता. प्रचंड औद्योगिक उत्पादन आणि अर्थव्यवस्थेची मुलभूत तत्वे ह्यावर आधारित हा अंदाज होता.[१] शेअरबाजार तर अत्युच्च शिखरावर पोहोचला आहे. सप्टेंबर २०१० मध्ये त्याचा निर्देशांक २०,००० च्या वर जाऊन पोहोचला. फोर्बस्च्या २०१०च्या अतिश्रीमंतांच्या यादीमध्ये वेगाने वाढत जाणाऱ्या अर्थव्यवस्थेमुळे भारतातील १७ नवीन खरबोपतींची भर पडली आहे आणि त्यांची संख्या आता ६९ वर जाऊन पोहोचली आहे.[२] मेरिल लिंच आणि केपजेमिनी ह्यांनी आपल्या अहवालात नमूद केले आहे की भारतातील अतिश्रीमंतांची संख्या - ज्यांची विनियोग्य मालमत्ता १० लाख डॉलर्स (किंवा ४.६ कोटी रुपये) आहे - गेल्या वर्षीच्या तुलनेत ५१% वाढून आता १.२७ लाख झाली आहे.[३]

फक्त भारतीय मीडिया, टी.व्हीच नव्हे तर अगदी प्रख्यात गुंतवणूक निपुण सॅम महतानी पासून मॅनेजमेंट गुरू पीटर ड्रकर पर्यंत सर्व जण भारत जगाच्या नकाशावर उच्च स्थानावर जाऊन पोहोचल्याचे, आर्थिक महासत्ता बनत असल्याचे भाकीत करत आहेत.

हे सगळे २००६-०७ मधील भाकीतांचे पुनरुच्चार आहेत. त्यावेळेलाही अर्थव्यवस्थेची भरभराट होऊन विकास दर ९% पर्यंत जाऊन पोहोचला होता. शेअरबाजार पण तेजीत होता, त्याने डिसेंबर २००७ मध्ये २०,००० चा निर्देशांक पार केला होता. आणि भाटांनी भारत आर्थिक महासत्ता होण्याचं भाकीत केलं होतं.

आम्ही हे पुस्तक पहिल्यांदा २००८ मध्ये लिहायला सुरुवात केली. तोपर्यंत भरभराटीची हवा निघून जायला सुरुवात झाली होती. २००४-०८ मधील उंचावत गेलेल्या वाढीचा वेग हा कृत्रिमरित्या फुगवलेला होता. आम्ही ही भरभराट विकृत असल्याचं स्पष्ट केलं होतं. ती अगाध गरिबीत जीवन जगणाऱ्या बहुसंख्य लोकांच्या क्रयशक्तीमध्ये वाढ झाल्यामुळे आलेली नव्हती. उलट, ती एका संकुचित पायावर आधारित होती. मोठमोठ्या कॉरपोरेशनस्नी लोकांची संपत्ती आणि पैसा लुटून केलेल्या कृत्रिम गुंतवणूकीमुळे होती; आणि धनदांडग्यांच्या प्रोत्साहित केलेल्या चंगळवादामुळे होती. आणि म्हणूनच, पाच वर्षांच्या उच्च विकास



दरानंतर जेव्हा अधिकृत अर्थतज्ञ जोरजोरात ओरडून सांगत होते की देश एका कायमस्वरुपी वाढीच्या विकासाच्या दिशेने चालला आहे, अगदी त्याचवेळेला अर्थव्यवस्था कोलमडायला लागली होती.

ही पुस्तिका काळजीपूर्वक वाचणाऱ्या कुठल्याही वाचकाला कळेल की २०१० ची भरभराट ही सुद्धा क्षणभंगूर आहे. कारण अर्थव्यवस्थेची मूलभूत तत्वे तर तीच आहेत – २००७ सारखीच.[४]

ऑक्टोबर २०१०.

# प्रस्तावना : २००८ ची इंग्रजी आवृत्ती

ब्रिटिशांनी आपल्याला गुलाम केलं, त्याला अजून फार काळ लोटला नाहीये. ह्या गोऱ्यां साम्राज्यवाद्यांनी आपल्या देशाचा ताबा घेतल्यानंतर सर्वात प्रथम आपली अर्थव्यवस्था मोडून टाकली आणि आपल्या स्वार्थानुरुप तिची पुनर्रचना केली. यावर त्यांनी एक वसाहतवादी सामाजिक, सांस्कृतिक आणि शैक्षणिक इमला उभा केला. स्वत:ची प्रशंसा करण्यासाठी काही भारतीय भाट पण तयार केले. भारतीयांना सुसंस्कृत करण्याच्या नावाखाली आलेल्या इंग्रजांनी प्रत्यक्षात मात्र या देशावर २०० वर्षे राज्य केले.

आपल्या देशातील लोकांनी अत्यंत कठीण आणि दीर्घ लढाई लढली आणि शेवटी स्वातंत्र्य मिळवलं. पण पुन्हा एकदा इतिहासाची पुनरावृत्ती होताना दिसत आहे. वरकरणी गोष्टी वेगळ्या दिसत असल्या, तरी अर्थ तोच आहे.

जागतिकीकरणाच्या नावाखाली परकीय लुटारूंना पुन्हा एकदा देशात निमंत्रित केलं जात आहे. आता दिवस बदलले आहेत. त्यावेळी ब्रिटिशांनी हत्यारांच्या बळावर कब्जा केला. आता मात्र आपणच त्यांचं पायघड्या घालून स्वागत करत आहोत. पंतप्रधान आणि त्यांचे मंत्रिमंडळ अथकपणे त्यांची कवने गात आहेत. आपल्याला असं सांगितल जातयं की आपण आपली अर्थव्यवस्था सांभाळू शकत नसल्यामुळे जागतिक बँक आणि आंतरराष्ट्रीय नाणेनिधी आपल्या मदतीला धावून आले आहेत. विकसित देशातील महाकाय कंपन्या - ज्यांना बहुराष्ट्रीय कंपन्या (MNCs) म्हटलं जातं - येऊन आपल्याला उच्च तंत्रज्ञान आणि भांडवल उपलब्ध करून देतील, त्यामुळे आपलं उत्पादन वाढेल आणि निर्यातही वाढेल. आता

आपल्या सगळ्या संकटांच निराकरण होईल. "इंडिया इज शायनींग" (भारत चमकतोय), भारत "आर्थिक महासत्ता" बनतोय, आणि आता १,२,३ आण्विक करारानंतर, भारत आण्विक महासत्ता सुध्दा बनेल! अत्यंत कृतज्ञतेपोटी पंतप्रधानांनी वॉशिंग्टनला जाऊन बुशना सांगितलं : भारत तुमच्यावर प्रेम करतो.[५]




भारत नक्कीच चमकतोय, पण धनदांडग्यांसाठी... २००७ मध्ये भारतीय अब्जाधीशांची संख्या ५३३ होती. त्यांची एकत्रित संपत्ती १२.३२ लाख कोटी रुपये होती. २००६ पेक्षा हा आकडा दुप्पट होता आणि २००५ पेक्षा चौपट - तेव्हा हा अगदी नगण्य म्हणजे ३.६४ लाख कोटी रुपये होता! अब्जाधीशांच्या क्लबचे सभासदही वाढले होते. काही माहिन्यांपूर्वी करोडपती असणाऱ्या १६८ नवीन लोकांची भर त्यात पडली होती. धनदांडग्यांच्या संपत्तीचा पाठपुरावा करणाऱ्या एक मासिकाने (बिजिनेस स्टॅन्डर्ड) म्हटले आहे : "भारतातील अब्जाधीशांची एवढी चांदी कधीच झाली नव्हती."[6]

प्रसारमाध्यमे टाटा आणि अंबानींच्या वाढत्या संपत्तीवर, त्यांनी किती परकीय कंपन्या ताब्यात घेतल्या यावर; भारताच्या GDP च्या वाढत्या आलेखावर; वाढत्या परकीय गुंतवणुकीवर; वाढत्या निर्यात दरावर; आपल्या सॉफ्टवेअर निर्यातीच्या भरभराटीवर; भारतीय बाजारपेठेत तुडूंब गर्दी करणाऱ्या जगभरातील चंगळवादी वस्तूंवर रोजच प्रकाशझोत टाकत असतात. त्यामुळेच येथील सामान्य माणूस, मॉलस्‌मधील चकाकत्या वस्तूंकडे फक्त दुरूनच पाहू शकत असला तरी किंवा BA/BCom च्या पदव्या घेऊनही कॉलेजच्या विद्यार्थ्यांना दोन/तीन हजाराच्या नोकऱ्यांवर समाधान मानावे लागत असले तरी, ते सुध्दा आता भारत महासत्ता बनणार या दिवास्वप्नावर विश्वास ठेवू लागले आहेत.

सर्वसामान्यांमधल्या बहुसंख्य जनतेसमोर खरा प्रश्न हा आहे, की धनदांडग्यांच्या ह्या वाढलेल्या संपत्तीमुळे त्यांना, म्हणजे कष्टकरी, कामगार, शेतकरी, विद्यार्थी, छोटे व्यापारी इ.ना, काय फायदा? त्यांना चांगल्या नोकऱ्या मिळतील? त्यांचे पगार वाढवून मिळतील? बाजारातल्या रोजच्या जीवनावश्यक वस्तूंच्या किंमती कमी होतील? शिक्षण स्वस्त होईल? स्वस्त दरामध्ये चांगली आरोग्यसेवा मिळेल? घरांच्या किंमती परवडण्यायोग्य होतील? इत्यादी इत्यादी.



## बिभत्स विषमता



वस्तूस्थिती ही आहे की जागतिकीकरणाने गरीब आणि श्रीमंतांमधील दरी खूपच वाढवली आहे. लोकसंख्येचा एक छोटासा हिस्सा विकसित देशातल्या लोकांप्रमाणे जीवन जगू लागला आहे. आणि दुसरीकडे कोट्यवधी सामान्यांना गरिबीच्या खाईत ढकललं आहे. आजपर्यंत त्यांची इतकी वाईट अवस्था कधीच झाली नव्हती हे सरकारी आकडेवारीवरून स्पष्ट होतं.

१९७० च्या दशकात योजना आयोगाने गरिबीची व्याख्या पोषण विषयक प्रमाणांच्या आधारावर परिभाषित केली होती. ह्या परिभाषेप्रमाणे ग्रामीण व शहरी भागातील ज्या लोकांना अनुक्रमे २४०० व २१०० कॅलरीज मिळू शकत नव्हत्या ते सगळे गरीब समजले गेले. (ग्रामीण लोकांसाठी पोषणाचं प्रमाण जास्त ठेवलं गेलं होतं कारण तुलनेने ते जास्त श्रम करतात). ह्या प्रमाणांच्या आधारे २००० सालच्या एका अधिकृत सर्वेक्षणानुसार (नॅशनल सॅम्पल सर्वे, किंवा NSS) खेड्यांतील तीन चतुर्थांश लोकांना (७४.५%), शिफारस केलेले किमान उष्मांकही (कॅलरिज) मिळत नव्हते. त्यांचा महिन्याचा माणशी खर्च ५६५ रुपयांपेक्षाही कमी होता. शहरातली स्थिती त्यामानाने थोडी बरी होती. फक्त ४५% लोकांना (ज्यांचा महिन्याचा माणशी खर्च ६२५ रुपायांपेक्षा कमी होता) शिफारस केलेल्या किमान कॅलरीज पेक्षा कमी कॅलरीज मिळतं होत्या.[७]

अगदी अलिकडील म्हणजे २००४-०५ च्या सर्वेक्षणानुसार परिस्थिती अजूनच बिघडली आहे. खेड्यातील ८७% लोकांना आणि ६४.५% शहरी लोकांना दिवसाला शिफारस केलेल्या किमान कॅलरिज पेक्षा कमी कॅलरिज मिळत होत्या.[८]

असं असताना, ह्याच आकडेवारीचा आधार घेऊन जागतिकीकरणाच्या दौऱ्यात गरिबी कमी झाली आहे असा निष्कर्ष सरकार कसा काढू शकतं? उदा. सरकारचा असा दावा आहे की ग्रामीण गरिबी कमी झाली आहे : १९९३-९४ च्या ३६% वरून २००४-०५ मध्ये २७.५% वर आली आहे. सरकारने ६०% गरीब ग्रामीण जनतेला दारिद्रयरेषेच्या वर आणण्यासाठी एक साधीशी युक्ती योजली: दारिद्रयरेषाच खाली आणली! एखाद्या व्यक्तीला शिफारस केलेल्या कॅलरिज मिळतात की नाहीत ह्याच्याशी नवीन दारिद्रयरेषेचा काहीही संबंध नाही. उदा.

२००४-०५ मध्ये NSS ने केलेल्या सर्वेक्षणानुसार शिफारिस केलेल्या कॅलरिज मिळण्यासाठी ग्रामीण भागात प्रतिव्यक्ति ७९५ रुपये, तर शहरी भागात प्रतिव्यक्ती १००० रुपये खर्च करावे लागले असते. पण त्यावर्षीची दारिद्र्यरेषा क्रमश : ३५६ रुपये आणि ५३९ रुपये होती. म्हणजे वास्तविकतेच्या अर्धी किंवा अर्ध्याहून कमी! ह्यामध्ये एका व्यक्तीला जास्तीत जास्त १८२० कॅलरिजच मिळू शकतात.[९]



ह्या धक्कादायक माहितीवर इतर पोषणविषयक आणि आरोग्य सर्वेक्षणांनी सुद्धा शिक्कामोर्तब केले आहे. २००५-०६ च्या राष्ट्रीय कुटुंब आरोग्य सर्वेक्षणानुसार, भारतातील ३ वर्षाखालील जवळपास अर्धी (४६%) मुलं ही वजनाने कमी आहेत, ही माहिती कुपोषणाचे प्रमाण दर्शवते. आणि ३८% तर वाढंच खुंटलेले आहेत, म्हणजे ते अत्यंत कुपोषित आहेत. ॲनीमियाची आकडेवारी तर अधिकच भयानक आहे. ६ ते ३५ महिन्याच्या वयोगटातील ७९% मुलं ॲनीमिक आहेत.[१०]

कुषोषण शारीरिक आणि मानसिक विकासावर प्रतिकूल परिणाम करते. युनिसेफच्या मते भारताइतकं कुपोषित मुलांच प्रमाण इतर कुठल्याही देशात नाही.[११] ज्या देशामध्ये जगभराच्या ४०% पेक्षा जास्त कुपोषित मुलं राहतात, तो देश आर्थिक महासत्ता बनण्याचा दावा कसा करू शकतो?[१२] ह्याचा अर्थ एकच की भारताचा ८-९% वार्षिक वाढीचा दर हा तळागाळातल्या लोकांपर्यंत पोहोचत नाही.

ह्या भयंकर आकडेवारीला, असंघटीत क्षेत्राच्या उपक्रमांच्या राष्ट्रीय आयोगाने (National Commission on Enterprises in Unorganised Sector, NCEUS) नुकत्याच दिलेल्या अहवालाने अजूनच पुष्टी मिळते. हा अहवाल ऑगस्ट २००७ मध्ये पंतप्रधानांना देण्यात आला. ह्यात असे नमूद करण्यात आले आहे की : ७७% - ८३ करोड - लोकांचे उत्पन्न दिवसाला २० रुपयांपेक्षा कमी आहे.[१३] महिन्याला ३००-४००-५०० रुपये मिळवणारे लोक कसं जीवन जगत असतील? दिवसाला फक्त १० ते १८ रु. खर्च करायचे असतील, तर कशावर खर्च



करणार? एका बाजूला हे चित्र, तर दुसऱ्या बाजूला ह्याच देशातल्या ५३३ अब्जाधीशांची एकूण संपत्ती १२ लाख कोटी आहे. ह्यापुढच्या कित्येक वर्षांसाठी ग्रामीण रोजगार कार्यक्रम चालवायला आणि कोट्यवधी गरीब लोकांना गरिबीतून बाहेर काढण्यासाठी हे पैसे पुरेसे आहेत.

हे पुस्तक वाचणाऱ्या सुशिक्षित तरूणांना कदाचित हे आकडे आश्चर्यजनक किंवा अविश्वसनीय वाटतील. बुध्दीवादी परिषदांमधून, प्रसारमाध्यमांमधून, वर्गातून रोजच त्यांना भारताबद्दल सुरस आणि रम्य कथा ऐकायला मिळत असतात. भारताच्या वाढत्या विकास दरामुळे गरिबी कशी कमी होत चालली आहे, भारत कसा एका अनिर्बंध उत्कर्षाच्या बिंदूकडे झेपावत चालला आहे, इ.इ.

मित्रहो, जागतिकीकरणाने संपत्तीवाटपामध्ये अत्यंत बिभत्स विषमता निर्माण केली आहे. एका बाजूला प्रचंड धनसंपत्ती एकत्र झाली आहे, तर दुसऱ्या बाजूला प्रचंड मोठ्या प्रमाणात गरिबी निर्माण होत आहे.

आपण जागतिकीकरणाच्या भारतीय अर्थव्यवस्थेवर होणाऱ्या परिणामांची चर्चा करण्याआधी इतिहासावर एक नजर टाकूया.

डिसेंबर २००८

## भाग एक
## जागतिकीकरण कशासाठी?

### नेहरू मॉडेल

नेहरू जरी समाजवादाच्या गप्पा करीत असत तरी स्वातंत्र्यानंतर नेहरूंच्या नेतृत्वाखालील भारतातील धोरणांचा उद्देश **भांडवली विकास साधणे हाच होता.** ह्याचे **मुख्य वैशिष्ट्य,** म्हणजे **मिश्र अर्थव्यवस्था** आणि १९४८ आणि १९५६ चे औद्योगिक धोरण. ही वैशिष्ट्ये **भारतीय भांडवलदारांच्या** समितीने शिफारस केलेल्या **आर्थिक योजनेवर** आधारित होती. जे.आर.डी. टाटा आणि गोवर्धनदास बिर्ला हेच या 'बॉम्बे प्लान' म्हणून नावारुपाला आलेल्या योजनेचे शिल्पकार होते.



स्वातंत्र्यानंतर भारतीय भांडवलदार वर्गाला विकसित भांडवली देशांमध्ये झालेली औद्योगिक क्रांती लागू करायची होती. ती देखील प्रचंड वेगाने. औद्योगिकरणासाठी पायाभूत उद्योग निर्माण करणं गरजेच होतं. पण १९४७ मध्ये भांडवलदार पायाभूत उद्योगांमध्ये गुंतवणूक करण्यास तयार नव्हते कारण एक तर त्यासाठी लागणारे प्रचंड भांडवल उभारणे त्यांना शक्य नव्हते आणि दुसरं म्हणजे हे उद्योग उभारण्यासाठी लागणारा प्रदीर्घ कालावधी आणि तुटपुंजा नफा. त्यांना कमी गुंतवणुकीतून भरघोस नफा देणाऱ्या उद्योगांमधे रस होता. उदा. ग्राहकोपयोगी वस्तूंचे उत्पादन. परंतु त्यासाठी पायाभूत उद्योगांची उभारणी आवश्यक होती.

भारतीय भांडवलदार वर्गाच्या सोयीसाठीच व त्यांच्या शिफारशीवरून शासनाने पुढाकार घेतला आणि वीज, वाहतूक, पोलाद, तेल, आणि इतर पायाभूत उद्योगांची सार्वजनिक क्षेत्रात उभारणी केली. त्यासाठी लागणारा पैसा सर्वसामान्य जनतेच्या कष्टाच्या कमाईतील बचतीमधून आणि त्यांच्यावर अप्रत्यक्ष कर लादून उभारण्यात आला. भारतीय भांडवलदारांनी आपला पैसा ग्राहकोपयोगी वस्तूंच्या उद्योगांमध्ये गुंतवला, जिथे झटपट नफा होता. इथे सुद्धा त्यांच्या उद्योगांसाठी लागणारे भांडवल सार्वजनिक वित्तीय उद्योगांमधूनच उभे केले गेले; त्यातून कमावलेला नफा मात्र भांडवलदारांच्या खिशात गेला. १९७० च्या दशकात भारतातील बहुतांश मोठ्या उद्योगपतींच्या कारखान्यासाठी उभ्या केलेल्या भांडवलामध्ये त्यांचा स्वत:चा हिस्सा १% पेक्षाही कमी होता. यामध्ये टाटा, बिर्ला, मफतलाल, सिंघानिया इ. सर्व सामील आहेत.[१४]

सार्वजनिक उद्योगांची उभारणी व खाजगी क्षेत्रास भांडवल पुरवठा या व्यतिरिक्त भारतीय शासनाने अर्थव्यवस्थेत अनेक प्रकारे सक्रिय हस्तक्षेप केला - मर्यादित साधनांचा नियोजितपणे वापर करणे, मक्तेदार घराण्यांवर अंकुश लावणे, लहान उद्योगांना प्रोत्साहन देणे, इ. **परकीय भांडवलाच्या प्रवेश व प्रभावावर नियंत्रण ठेवण्यासाठीपण सक्रिय पावले उचलली.** उदा. अर्थव्यवस्थेतील महत्वपूर्ण क्षेत्रांमध्ये MNCsना परवानगी नव्हती. ज्या क्षेत्रांमध्ये ते गुंतवणूक करू शकत होते तिथे सुध्दा ती मर्यादित प्रमाणात होईल हे पाहिले. एवढंच नाही तर नफा परत घेऊन जाण्यावरही बंधने घातली.

भांडवली विकासाचा हा मार्ग अवलंबताना भारताने विकसित देशांच्या १८व्या आणि १९व्या शतकातल्या विकासाच्या धोरणांचे अनुकरणच केले होते.



उदा. इंग्लंडपासून स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपल्या लहान उद्योगांना संरक्षण देण्यासाठी अमेरिकन सरकारने परकीय स्पर्धेला आळा घातला होता;[१५] १९व्या शतकाच्या शेवटी औद्योगिक क्रांतीला सुरुवात केल्यानंतर जर्मनीनेही हेच केलं होतं.[१६] फक्त भारतानेच नाही तर दुसऱ्या महायुध्दानंतर स्वतंत्र झालेल्या तिसऱ्या जगातील बहुतेक सर्व देशांमध्ये तिथल्या स्थानिक राज्यकर्त्यांनी याच प्रकारच्या स्वावलंबी भांडवली विकासाच्या मार्गावर चालण्याचा प्रयत्न केला होता.

## त्याच्या अपयशाची कारणे

परंतु भारतासारख्या तिसऱ्या जगातील देशांना भांडवलशाही विकासासाठी मुळातच खूप मर्यादा होत्या. त्यांच्यासाठी पाश्चिमात्य देशाच्या औद्योगिक क्रांतीचं अनुकरण करणं निव्वळ अशक्य होतं. साम्राज्यवादी देशांनी आपल्या औद्योगिक क्रांतीला लागणारे सुरुवाती भांडवल तिसऱ्या जगातील देशांना गुलाम करून, त्यांना लुटून, उभे केले होते. आणि त्यांच्या औद्योगिक क्रांतीची सुरुवात झाल्यानंतर ह्याच गुलाम देशांनी त्यांना लागणारा कच्चा माल आणि बाजारपेठही मोठ्या प्रमाणावर उपलब्ध करून दिली. परिणामी त्यांची औद्योगिक क्रांती कुठल्याही अडथळ्याविना सुरू राहीली.[१७]

२०व्या शतकाच्या उत्तरार्धात, जेव्हा तिसऱ्या जगातील देशांनी आपल्या भांडवली विकासाला सुरुवात केली, तेव्हा असा कोणताही देश नव्हता की जो लुटून ते आपल्या औद्योगिक क्रांतीचा पाया घालू शकले असते. किंबहुना, अनेक शतकांच्या गुलामीमुळे त्यांच्या स्वत:च्या अर्थव्यवस्था सुध्दा उद्ध्वस्त झाल्या होत्या. फक्त उद्ध्वस्त नाही तर अगदी विकलांग पण झाल्या होत्या.[१८] तेव्हा तिसऱ्या जगातील भांडवली विकासाची मॉडेल्स् अयशस्वी होणे हे सुरुवातीपासूनच अपरिहार्य होते असं म्हटलं तर त्यात काही अतिशयोक्ती नाही. आणि तसेच झाले. १९८० च्या दशकात येईपर्यंत भारतासह तिसऱ्या जगातील अनेक देशांचे स्वावलंबी भांडवली विकासाचे मॉडेल संकटग्रस्त झाले. १९९० पर्यंत ७० पेक्षा जास्त देश इतक्या विदेशी कर्जाच्या सापळ्यात अडकले होते की त्यांनी दिवाळखोरी घोषित केली.[१९] त्यांनी आता आपल्या अर्थव्यवस्थेच्या जागतिकीकरणाची सुरुवात केली. भारताबद्दल ह्याची कारणमीमांसा आम्ही खाली करत आहोत.

तरीसुध्दा जो मर्यादित भांडवली विकास भारतात होऊ शकला असता तेवढादेखील होऊ शकला नाही. कारण नेहरूंनी मूलगामी जमीन-सुधारणा कार्यक्रमाची अंमलबजावणी केली नाही. मोठ्या कारखान्यांच्या उभारणीवर खूपच

भर दिला, शेतीक्षेत्राकडे मात्र दुर्लक्षच झाले. जमीन सुधारणा कार्यक्रम, शेतीवर आधारित उद्योग, सहकारी चळवळ - अशा गोष्टींमुळे खेड्यातल्या करोडो लोकांची परिस्थिती सुधारायला मदत झाली असती. पण खुपच मर्यादित प्रमाणात आणि तेही देशातील काही भागांमध्येच ही पावले उचलली गेली. याशिवाय मध्ययुगीन मागासलेपणा, धार्मिक मागासलेपणा, जातीयवाद, पितृसत्ताक पध्दती ह्या गोष्टी नष्ट करण्याचे गंभीर प्रयत्नच केले गेले नाहीत, ज्यामुळे सामान्य जनतेची सृजनशक्ती कुंठित राहीली. परिणामी ७०% जनतेची खरेदी क्षमता विकसित झालीच नाही. स्थानिक बाजारपेठेच्या विकासाशिवाय औद्योगिक क्रांतीला खीळ बसणारच. याची परिणिती अगदी उघड होती. दोन दशकातच 'नेहरू मॉडेल' संकटात सापडले. नेहरूंनी आपल्या मरण्याच्या काही वर्ष अगोदर स्वत: संसदेमध्ये या गोष्टीची कबुलीही दिली होती.

**कर्जाच्या विळख्यात**




१९८० च्या दशकात या संकटावर मात करण्यासाठी भारतीय शासनाने मोठ्या प्रमाणावर परकीय कर्जे घेण्यास सुरुवात केली. आयात आणि परकीय प्रत्यक्ष गुंतवणुकीला देखील मर्यादित प्रमाणात परवानगी दिली. परिणामी भारतावरील परकीय कर्ज एका दशकातच चार पटींनी वाढले : १९८० मधील २०.६ अब्ज डॉलर्सवरून १९९० मध्ये ८३.७ अब्ज डॉलर्सवर पोहचले.[२०]

*[इथे एका अत्यंत महत्वाच्या आणि लोकांसाठी अनभिज्ञ अशा आर्थिक मुद्यावर आपलं लक्ष वेधायचे आहे. अंतर्गत आणि परकीय कर्जात मुळातच फरक असतो. अंतर्गत कर्जाची परतफेड राष्ट्रीय चलनात होते. परकीय कर्ज फेडण्यासाठी मात्र परकीय चलनाचीच आवश्यकता भासते. भारत सरकार अंतर्गत कर्ज नोटा छापून किंवा जनतेवर कर वाढवून फेडू शकते. पण बाहेरून डॉलरमध्ये कर्ज घेतलं, तर करांमधून मिळालेल्या पैशातून त्या कर्जाची परतफेड होऊ शकत नाही, कारण त्यातून परकीय चलन उदा. डॉलर्स मिळत नाहीत. परकीय कर्जाच्या परतफेडीसाठी डॉलर कमावण्याच्या अनेक पद्धती आहेत : निर्यातीतून मिळणारे डॉलर, किंवा परदेशी प्रवाशांपासून होणारी कमाई (जे डॉलर्स घेऊन*



*येतात) किंवा बाहेर नोकरीसाठी गेलेले लोक जे डॉलर्स भारतात पाठवतात. आणि जेव्हा ही कमाई कमी पडते तेव्हा बाहेरून अधिक कर्ज घ्यायला लागते.* ]

१९८० च्या दशकाच्या उत्तरार्धात भारत विदेशी कर्जाच्या सापळ्यात अडकला होता. १९९० पर्यंत येता येता आधी घेतलेल्या कर्जावरील व्याजाचे हप्ते भरण्याएवढे सुध्दा परकीय चलन भारताकडे नव्हते.

एकेकाळी तिसऱ्या जगाचे मालक असणारे पाश्चिमात्य सावकार ह्या संधीची वाटच पहात होते. भारत आणि इतर तिसऱ्या जगातील देशांनी केलेल्या शक्तीशाली स्वातंत्र्यलढ्यामुळे त्यांना ह्या देशांना स्वातंत्र्य देणं भाग पडलं होतं. तेव्हापासून ते ह्या देशांच्या अर्थव्यवस्था पुन्हा आपल्या ताब्यात कशा येतील ह्याचे वेगवेगळे मार्ग शोधत होते; म्हणजे पुन्हा एकदा त्यांना या देशांच्या बाजारपेठा आणि इथल्या कच्च्या मालावर ताबा मिळवणे शक्य झाले असते. त्यांना आता समजलं की ते भारत सरकारला आपल्या अर्थव्यवस्थेची पुनर्रचना करण्यासाठी आणि विदेशी भांडवल व सामानासाठी आपले दरवाजे उघडण्यास भाग पाडू शकतात.



विकसित देशांनी एकजूट करून भारताभोवती फास आवळण्यास सुरुवात केली. जागतिक बँकने - जी अमेरिका व इतर विकसित राष्ट्रांच्या मजबूत नियंत्रणाखाली आहे - १९९१ मध्ये भारताला अँडरसन मेमोरेन्डम नावाचा एक मसुदा दिला. ह्यामध्ये कित्येक आर्थिक सुधारणा सुचवण्यात आल्या होत्या : उदा. अर्थव्यवस्थेचे दरवाजे परकीय भांडवलासाठी उघडणे, व्यापाराचे उदारीकरण, सार्वजनिक क्षेत्रांचे खाजगीकरण इ.इ. ह्या बरोबरच पाश्चिमात्य देशांची सरकारे व वित्तीय संस्थांनी एकत्र येऊन भारताला कर्ज देणं बंद केलं आणि ह्या शिफारशी लागू करण्याची मागणी केली.[२१]

परकीय कर्ज रोखल्यामुळे, ३१ डिसेंबर १९९० रोजी भारताकडील परकीय चलनाचा साठा १.२ अब्ज डॉलर्स वर घसरला.[२२] १९९१ च्या सुरुवातीलाच भारतीय सरकार परकीय चलनाच्या संकटात गळ्यापर्यंत रुतले होते. दिवाळखोरी वाचवण्याचा आता एकच मार्ग उरला होता, तो म्हणजे विदेशी सावकारांच्या अटी मान्य करून आर्थिक पुनर्रचना कार्यक्रम राबवणे.

## जागतिकीकरणाला सुरुवात...

भांडवली विकासाच्या नेहरू मॉडेलने भारतीय समाजाचे ध्रुवीकरण केलेलेच होते. भारतीय समाज दोन हिश्शांमधे वाटला गेला. एका बाजुला भांडवलदार, बडे व्यापारी, राजकारणी, नोकरशहा, काळाबाजारवाले, डिलर्स, डिस्ट्रीब्युटर्स, सट्टाबाजारवाले, स्मगलर्स, माफिया, इ.इ. - म्हणजे बांडगुळं. ते लोकसंख्येच्या ५% होते. तर दुसऱ्या बाजूला कष्टकरी, कामगार, शेतकरी, विद्यार्थी, बुध्दीजीवी म्हणजेच सर्वसामान्य. ते लोकसंख्येच्या ९५% होते. देशातील राजकीय सत्तेवर पहिल्या हिश्श्याच नियंत्रण आहे. **राजकीय पक्षही फक्त त्याच हिश्श्याचे हित पाहतात.**

१९९० च्या दशकाच्या सुरुवातीला भारतीय शासकांच्या स्वायत्त भांडवली विकासाच मॉडेल गंभीर स्वरुपात संकटग्रस्त झालेले होते. भारतीय भांडवलदार एव्हाना या निष्कर्षाला येऊन पोहोचले की आपले नफे आणखी वाढवायचे असतील तर स्वतंत्र भांडवलशाहीच्या विकासाचं स्वप्न सोडून साम्राज्यवादी देशांचे सक्रीय हस्तक व्हायला लागेल. जागतिक बँक (World Bank किंवा WB) आणि आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या (International Monetary Fund किंवा IMF) अटी स्वीकारून 'नेहरू मॉडेल' मोडीत काढण्याचा निर्णय घेतला आणि विदेशी भांडवल, सामान ह्यासाठी अर्थव्यवस्थेचे दरवाजे उघडले.



एकेकाळी ब्रिटीश भारतात जे नफे कमावत होते, ते आपल्याला मिळावेत ह्या हेतूने स्वातंत्र्यलढ्याला मदत करणारे हे भांडवलदार अधिकाधिक नफ्यासाठी देशाची स्वायत्तता गहाण टाकायला तयार झाले. देश विकायला तयार झाले.

१९९१ मधील मे महिन्यात लोकसभेच्या निवडणुका झाल्या. त्यामध्ये पी.व्ही.नरसिंह राव आणि मनमोहन सिंग यांच्या नेतृत्वाखालील काँग्रेसचे सरकार सत्तेवर आले. आल्या आल्या त्यांनी पश्चिमी बहुराष्ट्रीय कंपन्या (Multinational Corporations किंवा MNCs), त्यांची सरकारे आणि त्यांचे हस्तक - म्हणजे WB आणि IMF - यांच्या 'आर्थिक सुधारणा कर्जा'च्या अटी मान्य केल्या. त्या अशा :

१. आयातीला खुली सूट आणि निर्यातभिमुख उत्पादनाला प्रोत्साहन देणे;



२. औद्योगिक, शेती आणि वित्तीय क्षेत्रातील परकीय गुंतणुकीवरील सर्व निर्बंध हटवणे;

३. शेअर बाजारातील परकीय गुंतवणुकीवरील सर्व निर्बंध हटवणे;

४. मुक्त बाजार व्यवस्थेला प्रोत्साहन देण्याच्या नावाखाली नफाखोरीवरील सर्व सरकारी निर्बंध हटवणे; गरिबांना मिळणाऱ्या शिक्षण, आरोग्य, आणि अन्नधान्यावरील अनुदानांसहीत सर्व अनुदाने बंद करणे; पाणी, वीज, आरोग्य, शिक्षण यांसह सर्व सार्वजनिक क्षेत्रांचं खाजगीकरण करणे.

**विदेशी कर्जदारांच्या अटींवर झालेल्या ह्या आर्थिक पुनर्रचना कार्यक्रमालाच 'जागतिकीकरण'** असे गोंडस नाव दिले गेले.

विरोधी पक्षांनी सुरुवातीला आर्थिक सुधारणांना विरोध केला. त्यानंतर आजतागायत आलटून पालटून सर्व पक्ष या ना त्या मार्गाने केंद्रात आणि राज्यात सत्तेवर येऊन गेले. विरोधी पक्ष म्हणून काम करताना त्यांनी जरी ह्या धोरणांवर सडकून टीका केली असली, तरी सत्तेवर आल्यावर मात्र सर्वांनी हीच धोरण जोमानं पुढ रेटली. ह्याचाच अर्थ असा की आर्थिक सुधारणा हा सर्व पक्षांची सहमती असलेला कार्यक्रम आहे.

भांडवलदार वर्ग, त्यांचे हुजरे बुध्दीवादी, त्यांचे प्रचारतंत्र म्हणजे मीडिया - हे सगळे ह्या धोरणांच समर्थन करत आहेत. जागतिकीकरण सर्व भारतीय शासकवर्गाचा सर्वसहमत कार्यक्रम आहे. आणि अशाप्रकारे १९९१ पासून केंद्रातील सरकारे जरी बदलत असली तरी भारतीय अर्थव्यवस्थेचं जागतिकीकरण मात्र पंख पसरत आहे.

## जागतिकीकरण: कुणाच्या फायद्यासाठी?

ऐतखाऊ भारतीय उच्चभ्रू वर्ग भलताच उत्तेजित झाला आहे. परकीय भांडवल मोठ्या प्रमाणात भारतीय अर्थव्यवस्थेच्या प्रत्येक क्षेत्रात प्रवेश करत आहे : पायाभूत उद्योग आणि ग्राहकोपयोगी वस्तूंपासून सेवाक्षेत्रापर्यंत. काही भारतीय भांडवलदार ह्या उद्योगांमध्ये त्यांचे लहान भागीदार बनले आहेत. तर त्यातलेच काही कंत्राटदार आणि विक्रेते बनून बक्कळ नफा कमावू लागले आहेत. जनतेच्या घामाच्या पैशातून उभी केलेली सार्वजनिक क्षेत्रे कवडीमोल किंमतीत विकून त्यांचं खाजगीकरण करण्यात येत आहे. ह्यातलेच काही तुकडे आपल्या देशी भांडवलदारांनाही मिळत आहेत. शिक्षण, वीज, आरोग्य, दळणवळण, एवढंच

नाही, तर पाण्यासारख्या सेवांचही खाजगीकरण केलं जातं आहे. नफेखोरीच्या सर्व मर्यादा काढून घेतल्या आहेत. म्हणूनच आता भारतीय भांडवलदारही ह्या सर्व क्षेत्रांमध्ये हातपाय पसरू लागले आहेत. कारण ह्या सर्व अत्यावश्यक सेवा असल्यामुळे त्यात भरपूर नफा कमावता येऊ शकतो. भारतीय धनदांडग्यांनी आता अर्थव्यवस्थेच्या भविष्यातील वाढीच्या शक्यतेचा विचार करणं सोडून दिलं आहे. ते फक्त त्यांचे खजिने भरण्यात गुंतले आहेत.



परकीय आणि भारतीय मोठमोठ्या कॉर्पोरेशनस्च्या लूटीला आता काहीच सीमा नाही. ते आता डोंगर, जंगलं, नद्या, जमिनी, सर्व नैसर्गिक संपदा अक्षरश: लुटून नेत आहेत. सरकारने त्यांना हजारो एकर जमिनीचा ताबा घेण्याची परवानगी दिली आहे. शेकडो वर्षांपासून लोक ज्या जमिनींवर राहत आहेत, त्यांना त्यांच्या जमीनींपासून उद्ध्वस्त केलं जात आहे. या जमिनींवर कॉर्पोरेशनस्ना हवं ते करायची परवानगी आहे - जमीनींखालील खनिज संपदा काढण्याची, प्रदूषण करणाऱ्या कंपन्या सुरू करण्याची, गोल्फ मैदाने बांधण्याची, गृहप्रकल्प बांधण्याची, प्रवांशांसाठी हॉटेल्स बांधण्याची.

काळाबाजारवाल्यांसाठी तर कुरणच आहे - बाजारपेठा खुल्या करण्याच्या नावाखाली त्यांच्यावर नियंत्रण ठेवणारे कायदे शिथील केले जात आहेत. सट्टेबाजारवाल्यांची तर चांदीच आहे. जागतिकीकरणामुळे सुखावलेला आणखी एक वर्ग म्हणजे उच्च मध्यमवर्ग. हा ही जागतिकीकरणावर भलताच फिदा आहे. कारण अमेरिकन लोक जे खातात/पितात ते इथं बसून खाता/पिता येतं; अमेरिकन गाड्या वापरायला मिळतायत; अमेरिकन चड्ड्या वापरायला मिळतायत आणि अगदी अमेरिकन पध्दतीचे संडासही वापरायला मिळतायत. त्यामुळे आता भारत अमेरिकेच्या बरोबरीला पोहोचत आहे अशी मुक्ताफळं ही मंडळी उधळीत आहेत.

भारतातील नामवंत बुध्दीजीवी आणि मीडिया – भांडवलदारांचे अत्यंत विश्वासू नोकर – सर्वसामांन्यांच्या गळी जागतिकीकरणाचा 'महीमा' उतरवण्यासाठी आक्रमकपणे नगारे बडवत आहेत. परकीय कंपन्या आणि परकीय भांडवल भारतात येणं म्हणजेच देशाचा विकास होणं असं चित्र रंगवल जातय. त्यांचा असा दावा आहे की बहुराष्ट्रीय कंपन्याच्या भारतातील मुक्त प्रवेशामुळे या देशातील उद्योगात



स्पर्धात्मकता वाढेल, ते अधिक कार्यक्षम होतील, आणि जगन्मान्य होतील. स्पर्धेतील वाढीमुळेच किंमती कमी होतील. बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या भारतीय अर्थव्यवस्थेतील प्रवेशामुळे लाखो लोकांना रोजगार मिळेल. परिणामी बेरोजगारी आणि गरिबी दूर व्हायला मदत होईल. आणि भारत आर्थिक महासत्ता बनेल.

असं होतं तर मुळात आपण त्यांना १९४७ मध्ये हाकललंच का? गांधी, सुभाषचंद्र बोस, भगतसिंग ह्यांना त्यांच्या फायद्याबद्दल बहुदा चुकीची माहिती होती!!

जागतिकीकरणाचे भारतीय अर्थव्यवस्थेवर आणि सामान्य जनतेवर काय परिणाम होतायत ते पाहण्यापूर्वी आपण परकीय भांडवलाच्या ओघाच्या (याला Foreign Direct Investment किंवा FDI म्हणजेच परकीय थेट गुंतवणूक म्हटलं जातं) फायद्याबद्दलच्या काही भ्रमांवर नजर टाकूया.

## भाग दोन
## परकीय थेट गुंतवणुकीबाबत भ्रम

### (१) भारतातील उद्योगांची स्पर्धात्मकता खरच वाढेल का?

बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या अजस्त्र आकारमानासमोर भारतातील अधिकांश उद्योग कस्पटासमान आहेत. MNCs इतक्या राक्षसी आहेत की आज केवळ २०० सर्वात मोठ्या कंपन्या जगातील २५% पेक्षा जास्त अर्थव्यवहार नियंत्रित करतात.[२३] संपूर्ण देशच्या देश नियंत्रणाखाली आणण्याची त्यांची क्षमता आहे. 'वॉलमार्ट' ही किरकोळ व्यापारातील बलाढ्य कंपनी १६१ देशांपेक्षा मोठी आहे. 'मित्सुबिशी' इंडोनेशियापेक्षा मोठी आहे. 'फोर्ड' दक्षिण अफ्रिकेपेक्षा मोठी आहे. जगातील सर्वांत मोठ्या १०० अर्थव्यवस्थांमध्ये ५१ बहुराष्ट्रीय कंपन्या आहेत, तर फक्त ४९ देश आहेत.[२४]

अर्थातच, भारतीय उद्योगांसाठी या महाकाय कंपन्यांबरोबर स्पर्धा केवळ अशक्य आहे. त्यांच्याबरोबर फक्त भागीदारी शक्य आहे. आणि घडतयंही नेमकं हेच. भारतीय बडे उद्योगपती बहुराष्ट्रीय कंपन्यांचे छोटे भागीदार होत आहेत. दरम्यान लघुउद्योग जमीनदोस्त होत आहेत: लाखो लघुउद्योग ठप्प झाले आहेत आणि इतर देखील त्याच मार्गावर आहेत.

## (२) यामुळे किंमती कमी होतील?

कॉलेजांच्या अभ्यासक्रमामध्ये, स्पर्धेमुळे कंपन्या खर्चात कपात करतात, परिणामी किंमती कमी होतात, असेच अजुनही शिकवतात. ते १९व्या शतकातल्या मुक्त किंवा लहान स्वरुपातील भांडवलशाहीच्या युगात घडत होते, जेव्हा हजारो छोट्या कंपन्या तग धरून राहण्यासाठी गळेकापू स्पर्धेत उतरल्या होत्या. ‘मक्तेदारी भांडवलशाही’ अशा आर्थिक नियमांनुसार चालत नाही – मक्तेदार कंपन्या आपापसातील सहकार्याने कृत्रिमरित्या भाव जास्त ठेवतात.

आज जागतिक उत्पादनातील जवळजवळ प्रत्येक क्षेत्रावर मूठभर बहुराष्ट्रीय कंपन्यांचा ताबा आहे. स्वयंचलित वाहने, इलेक्ट्रॉनिक्स, विमानवाहतूक, पोलाद, तेल, संगणक आणि रासायनिक उत्पादनांच्या क्षेत्रात त्या त्या क्षेत्रातल्या फक्त पाच सर्वात मोठ्या कंपन्यांचा एकूण जागतिक विक्रितील वाटा ३० ते ६०% आहे.[२५] औषधांच्या ३०० अब्ज डॉलर्सच्या जागतिक बाजारपेठेतील एक चतुर्थांश भागावर आघाडीच्या फक्त ७ कंपन्यांचा ताबा आहे.[२६] केवळ सहा कृषी रासायनिक कंपन्यांची जनुकीय अभियांत्रिकी खाद्याच्या (genetically engineered food) जागतिक उद्योगावर हुकूमत आहे.[२७]

मक्तेदार कंपन्या संख्येने कमी असल्यामुळे आपापसांत किंमतींमध्ये स्पर्धा न करण्याचा अलिखित संकेत पाळतात. कारण ह्या कंपन्या महाबलाढ्य आहेत, सर्वांजवळ भरपूर भांडवल आहे, सगळ्या भरपूर नुकसान सहन करू शकतात, आणि म्हणून किंमतींच्या स्पर्धेमुळे त्या सगळ्याच आपला सर्वनाश ओढवून घेतील. ह्याऐवजी ते आता आपापसात सामंजस्याने किंमती जास्त ठेवतात आणि अवाढव्य नफे कमावतात. त्यांच्यामध्ये आता स्पर्धा फक्त बाजारपेठेतील वाट्यासाठी होते. विविध प्रकारची आक्रमक जाहिरातबाजी व विक्री तंत्रे (उदा. मालाच्या बाह्यस्वरूपातील विविधता) ही ह्या स्पर्धेची मुख्य अस्त्रे आहेत. जाहिरातींसाठी ते करोडो रुपये खर्च करू शकतात.[२८] ह्याचं अगदी साधं उदा. म्हणजे शीतपेयांच क्षेत्रं. कोक आणि पेप्सी ह्या शीतपेयांच्या क्षेत्रातील राक्षसी उद्योगांचा भारतीय शीतपेय उद्योगावर पूर्ण ताबा आहे. बाजारपेठेसाठी तीव्र स्पर्धा करणाऱ्या ह्या कंपन्या किंमतीमध्ये स्पर्धा करण्याच्या भानगडीत कधीच पडत नाहीत. उलट आपापसात संगनमत करून ते किंमती





फुगवतात आणि काही पैसे उत्पादन खर्च असलेली ३०० मि.लि. रंगीत पाण्याची बाटली चक्क १० रुपयांना विकतात. आता स्पर्धा फक्त बाजारपेठच्या वाट्यासाठी होते - एक शाहरूख खानला घेतो, तर दुसरा सचिन तेंडुलकरला.

## (३) बहुराष्ट्रीय कंपन्या रोजगार निर्माण करतील का?

जागतिकीकरण, परकीय भांडवलाचा ओघ आणि बहुराष्ट्रीय कंपन्यांचा भारतीय अर्थव्यवस्थेतील प्रवेश ह्या सगळ्या गोष्टींबाबत एक सर्वात मोठा भ्रम म्हणजे ह्यांच्यामुळे रोजगार निर्माण व्हायला मदत होते. वस्तूस्थिती याच्या उलट आहे.

MNCs अगदी थोडा रोजगार निर्माण करतात. कारण सोप्पं आहे : नवीन माहिती तंत्रज्ञानाच्या विकासामुळे अगदी थोड्या लोकांना नोकरीवर ठेवूनसुध्दा त्या खूप जास्त उत्पादन करू शकतात आणि जागतिक बाजारपेठेवर वर्चस्व गाजवू शकतात. UN (United Nations) च्या एका अहवालाप्रमाणे तिसऱ्या जगातील सर्व देशांमध्ये मिळून बहुराष्ट्रीय कंपन्यांमध्ये फक्त ७० लाख लोक प्रत्यक्षपणे काम करतात – या उप्पर एवढीच संख्या अप्रत्यक्षपणे काम करणाऱ्यांची आहे.[२९] ७० लाख ही संख्या भारतात दरवर्षी बाजारात नव्याने रोजगार शोधण्यासाठी येणाऱ्यांच्या संख्येपेक्षाही कमी आहे. म्हणूनच मीडियाने कितीही स्वप्ने दाखवली असली तरी MNCsनी भारतात पण खूपच कमी रोजगार उपलब्ध केला आहे. यापैकी काही थोड्या उच्च पगाराच्या नोकऱ्या आहेत. परंतु प्रसारमाध्यमे मात्र MNCs निर्माण करत असलेल्या ह्या अतिशय तुटपुंजा नोकऱ्यांचा डांगोरा पिटत आहे. परिणामी अगदी सर्वसामान्य लोकांचे सुध्दा असे मत बनू लागले आहे की जागतिकीकरणामुळे नजिकच्या भविष्यकाळात बेरोजगारीचा प्रश्न जणू काही सुटणारच आहे.

सत्य परिस्थिती यापेक्षा खूपच वाईट आहे. जो तुटपुंजा रोजगार ह्या बहुराष्ट्रीय कंपन्या तयार करतात त्यापेक्षा कितीतरी पटींनी जास्त रोजगार त्या नष्ट करतात - लघुउद्योग बंद पडल्यामुळे, शेती उध्वस्त झाल्यामुळे इ.इ. भारतातील बेरोजगारीची स्थिती गेल्या दशकात कशी बिघडत गेली आहे, हे आपण या पुस्तकात पुढे पाहणारच आहोत.

## (४) मग बहुराष्ट्रीय कंपन्या करतात तरी काय?

जर बहुराष्ट्रीय कंपन्या रोजगार निर्माण करत नाहीत, जर बहुराष्ट्रीय कंपन्यांमुळे किंमती कमी होत नाहीत, तर मग त्यांचा समाजाला फायदा काय?

प्रसारमध्यमांतून दररोज होणारा गाजावाजा चिकित्सक वृत्ती न ठेवता सहजपणे स्वीकारण्याऱ्यांसाठी वास्तव धक्कादायक आहे. बहुराष्ट्रीय कंपन्यांचा आपल्याला काहीच फायदा नाही.



त्यांच्या अस्तित्वाचा एकमेव उद्देश आहे नफा कमावणे.

त्याव्यतिरिक्त त्या काय करतात? त्या आणखी नफा कमावतात. खरंतर अवाढव्य नफा (सुपर प्रॉफिट). कारण किमती वाढवण्यासाठी त्यांच आपसात संगनमत असतं.

यामुळे मक्तेदारी भांडवली व्यवस्था वाढीसाठी पछाडलेली असते. GDP (Gross Domestic Product) ची वाढ ही गेल्या वर्षीच्या तुलनेत ह्या वर्षी किती जास्त वस्तू विकल्या गेल्या, ह्याचे प्रमाण सांगते, आणि म्हणून भांडवलदार वर्गाने किती नफा कमावला हेही ते प्रतिबिंबित करते. पण स्पर्धात्मक भांडवलशाही व्यवस्थेप्रमाणे, मक्तेदारी भांडवलशाही व्यवस्थेमध्ये आर्थिक वाढ खालपर्यंत झिरपत नाही.

### *GDP ची वाढ विकसित देशांमध्ये झिरपत नाही*

मक्तेदारी भांडवलशाहीचे समर्थक कितीही प्रचार करत असले तरी MNCsच्या वर्चस्वात असलेल्या अर्थव्यवस्थेत आर्थिक वाढ खालपर्यंत पोहोचत नाही. हे तिसऱ्या जगातील देशांतही घडत नाहिये आणि विकसित देशांमध्येही घडत






नाहीये. उदा. अमेरिकेत १९७० पासून आजपर्यंत कमाईमध्ये जी काय वाढ झाली आहे, त्याचा मोठ्या प्रमाणात फायदा धनदांडग्यांनाच झाला आहे. मध्यम वर्गाला आणि कमी आर्थिक गटाच्या लोकांना मात्र अगदी नगण्य फायदा मिळाला आहे.

वर दाखवलेल्या तक्त्याप्रमाणे, १९७९ ते २००४ च्या काळात अमेरिकेतील सर्वात वरच्या १% लोकांचे कर वजा जाता वास्तव उत्पन्न जवळजवळ तिपटीने वाढले, ५.५४ लाख डॉलर्सनी किंवा १७६% नी. दुसऱ्या बाजूला मधल्या २०% लोकांचे कर वजा वास्तव उत्पन्न तुलनेने मर्यादित म्हणजेच २१% नी वाढले, किंवा ८,५०० डॉलर्सनी; तर सर्वात गरीब २०% लोकांचे वास्तव उत्पन्न फक्त ६% वाढले, किंवा ८०० डॉलर्सनी.[३०]

### *तिसऱ्या जगातील देशांमध्येही ती झिरपत नाही*

गुलाम असलेल्या देशांबद्दल (त्यांना उदात्तपणे 'विकसनशील देश' असं म्हणतात) बोलायच तर त्यांनी आपल्या देशांच्या अर्थव्यवस्थेचे दरवाजे बहुराष्ट्रीय कंपन्यांसाठी उघडे केल्यानंतर या महाकाय कंपन्या त्यांना लुबाडणारच. या सगळ्या देशांमध्ये एक प्रचंड शोकांतिका गारिबीची, बेरोजगारीची, दारिद्र्याची, आजारांची • घडत आहे. आर्थिक सुधारणांचा इतका मोठा आघात लॅटिन अमेरिकेला सोसावा लागला की १९६० आणि १९७० च्या दशकातला त्यांचा सारा विकास पुढच्या एका दशकात पार वाहून गेला. आफ्रिकेला तर चरकात पिळून काढलेल्या ऊसाचे चिपाडच करून टाकले आहे. २१व्या शतकाच्या सुरुवातीला या खंडाची स्थिती इतकी हलाखीची झाली आहे की आफ्रिका म्हटल्याबरोबर साऱ्या जगासमोर दीनदुबळ्या व भुकेकंगाल लोकांचे चित्र उभे राहते.[३१]

### MNCs जगावर प्रभुत्व गाजवतायत

ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही; हे अस्संच घडणार होत. MNCsच्या कामाचं तर्कशास्त्र आजही तेच आहे जे २०व्या शतकाच्या सुरुवातीला होतं, जेव्हा ह्या कंपन्या आणि त्यांच्या बटीक सरकारांनी तिसऱ्या जगातील देशांना गुलाम करण्यासाठी आपापसात मारामाऱ्या केल्या.

१) बहुराष्ट्रीय कंपन्या महाकाय कंपन्या आहेत, आणि त्यांची उत्पादन क्षमताही बेफाट आहे. ह्यासाठी त्यांना मोठ्या प्रमाणात कच्च्या मालाची गरज असते. अनेक महत्वाचे कच्च्या मालाचे स्त्रोत तिसऱ्या जगात आहेत. आणि म्हणूनच जिथे त्यांचे प्रतिस्पर्धी सुद्धा त्यांच्याइतकेच महाकाय व सशक्त आहेत, तिथे कच्च्या मालावर जास्तीत जास्त ताबा मिळवणे हे त्यांच्यासाठी गरजेचे बनते. मग तो जिथे असेल तिथे ते धाव घेतात. आणि अर्थातच कमीत कमी किंमतीत त्यावर नियंत्रण मिळवण्याच्या प्रयत्नात असतात.



२) बहुराष्ट्रीय कंपन्या, अगदी त्यांच्या जन्मापासूनच, परकीय बाजारपेठा ताब्यात घेण्यासाठी प्रयत्नशील राहिल्या आहेत. कारण प्रचंड प्रमाणात उत्पादन असल्यामुळे त्यांना त्यांच्या देशातील बाजार कमी पडतो. आणि जोपर्यंत त्यांचा माल विकला जात नाही, तोपर्यंत ते पुन्हा गुंतवणूक करू शकत नाहीत; तोपर्यंत त्यांना त्यांच्या वाढीचा दर कायम ठेवता येत नाही.

३) बहुराष्ट्रीय कंपन्यांना भांडवली गुंतवणूक करण्यासाठीसुध्दा परकीय बाजारपेठ लागते. ह्या महाकाय कंपन्या एकमेकीत स्पर्धा करतात, पण ती बाजारपेठीय असते. म्हणून नव्या बाजारपेठेत लवकरात लवकर घुसून आपलं प्रभुत्व स्थापन करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. म्हणजे मग प्रतिस्पर्ध्याला तिथे प्रवेश करणे कठीण जाते.

मक्तेदार कंपन्या विकसित देशांमध्ये १८७०च्या सुमारास उदयाला आल्या.[३२] अविरत भांडवल संचय हा भांडवलशाहीचा ऊर्जास्त्रोत आणि आत्मा आहे. यासाठी इतर देशांच्या साधन संपत्तीचा वापर करण्याची हाव व गरज भांडवली विकासाच्या सर्व टप्प्यांमध्ये असते. मक्तेदार कंपन्या अस्तित्वात आल्यानंतर तर विकसित भांडवली देशांमध्ये आशिया, अफ्रिका आणि द. अमेरिकेच्या तोपर्यंत गुलाम नसलेल्या देशांना गुलाम बनवण्यासाठी स्पर्धाच सुरू झाली. १९१४ पर्यंत वसाहती शक्तींनी पृथ्वीच्या ८५% जामिनीवर ताबा मिळवला होता, आणि जवळजवळ संपूर्ण जगावर त्यांवे आर्थिक आणि राजकीय नियंत्रण होते.

जेवढ्या वसाहती निर्माण करणे शक्य होते, तेवढ्या वसाहती निर्माण केल्यानंतर, त्यांनी त्याच वसाहतींची पुनर्विभागणी करण्यासाठी दोन भयंकर



महायुध्दे केली. अमेरिका, युरोप व जपानसारखे विकसित भांडवलदारी देश साम्राज्यवादी राष्ट्र म्हणून ओळखले जाऊ लागले. पण दुसऱ्या महायुध्दानंतर जगाच्या नकाशावर साम्राज्यवाद्यांचे खेळ बिघडविण्यासाठी एका नवीन शक्तीचा उदय झाला. वसाहतींचे लोक बंड करून उठू लागले, साम्राज्यवाद्यांना तेथून पळ काढावा लागला आणि वसाहतींना स्वातंत्र्य द्यावे लागले.

जगावर सत्ता गाजवणे हा साम्राज्यशाहीचा अंगभूत गुण आहे. दुसऱ्या महायुध्दानंतर अमेरिका जगातला सगळ्यात शक्तीशाली साम्राज्यवादी देश बनला. आणि म्हणून सुरुवातीपासूनच तिसऱ्या जगातील देशांच्या स्वतंत्र विकासाला त्यांनी अडथळे आणण्याचे प्रयत्न केले. सगळ्या युक्त्या प्रयुक्त्या योजून पुन्हा या देशांच्या अर्थव्यवस्थांवर ताबा कसा मिळवता येईल असा प्रयत्न सुरू केला – म्हणजे मग व्यापारासाठी आणि त्यांच्या बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या भांडवली गुंतवणुकीसाठी या देशांचे दरवाजे उघडे राहतील. यासाठी अनेक तथाकथित परकीय मदतीचे कार्यक्रम घेतले. विकसित देशांतर्फे तिसऱ्या जगातील देशांना दिल्या गेलेल्या कर्जाचा मोठा हिस्सा IMF/WB सारख्या आंतरराष्टीय वित्त संस्थांमार्फत दिला गेला. अमेरिका व इतर विकसित देशांचा ह्या संस्थांवर निर्णायक ताबा आहे. ह्याने काम होत नाही असं वाटल्यावर, अमेरिकेने त्यांची कठपुतळी बनायला तयार नसलेल्या देशांची सरकारे CIA द्वारा उलथवून टाकली - १९५३ मध्ये इराणच्या मोसाद्दिक सरकार पासून ते १९७३ ला चिलीच्या अलांदे सरकार पर्यंत. जिथे गरज वाटली (आणि शक्य होतं) तिथे आपलं सैन्य पाठवून स्वतंत्र विकासाचा मार्ग निवडणाऱ्या सरकारांना सत्तेवरून खाली पाडले - व्हिएतनाम आणि कोरिया पासून ते ब्राझील, ग्वाटेमाला, डॉमिनिकन रिपब्लिक पर्यंत. ह्या देशांमध्ये लाखो माणसे मारली गेली.[३३]




१९८२ पर्यंत तिसऱ्या जगातील अनेक देश परकीय कर्जाच्या सापळ्यात अडकले होते. त्यांच्या अमेरिका, युरोप आणि जपानी बँकांकडून घेतलेल्या कर्जाचा आकडा ७८५ अब्ज डॉलर्सवर पोहोचला. या प्रचंड परकीय कर्जाची परतफेड करणे अशक्यच होते. त्याच वर्षी यातल्या २२ देशांनी परकीय कर्जाचा हप्ता चुकवण्याबाबत असमर्थता जाहीर केली आणि संकटातून बाहेर पडण्यासाठी IMF/WB कडे कर्जासाठी जाऊन पोहोचले.[३४]

तिसऱ्या जगातील देशांच एक चक्र पूर्ण झालं. साम्राज्यवादी देशांना आपले फास तिसऱ्या जगाभोवती आवळायची संधी चालून आली. IMF/WB वर असलेल त्यांचं नियंत्रण वापरून त्यांनी ह्या देशांचे हात पिरगळायला सुरुवात केली. या देशांना त्यांच्या अर्थव्यवस्था पाश्चिमात्य भांडवलासाठी खुल्या करण्यास भाग पाडले. त्यांच्यावर असलेले सर्व निर्बंध हटविण्यास भाग पाडले. हेच जागतिकीकरणाचं वास्तव आहे. अमेरिकेचे भूतपूर्व सेक्रेटरी ऑफ स्टेट हेन्री किसिंजर १९९९ मध्ये एका भाषणात स्पष्टपणे म्हणाले, 'जागतिकीकरण हे अमेरिकन साम्राज्यशाहीचे दुसरे नाव आहे.'[35]




## भाग तीन

# जागतिकीकरणाचे भारताच्या परकीय चलनाच्या संकटावरील परिणाम

आता आपण IMF/WB ने आपल्या देशावर लादलेल्या अटींचा - ज्याला जागतिकीकरण असे गोंडस नाव दिले आहे - भारताच्या परकीय चलनाच्या संकटावर काय परिणाम होतोय ते पाहूया. परकीय चलनाच्या संकटामुळेच तर जागतिकीकरणाला सुरुवात झाली.

### (क) मुक्त व्यापार

IMF/WBच्या सिद्धान्तानुसार भारतात जर विदेशी कंपन्या आल्या आणि परकीय व्यापार वाढला तर भारताच्या अर्थव्यवस्थेत विविधता येईल, आणि भारत विविध प्रकारच्या वस्तूंची निर्यात करू शकेल - परिणामी मोठ्या प्रमाणात निर्यात वाढेल आणि भारत आपलं परकीय कर्ज फेडू शकेल.

या युक्तीवादाचे वस्तुनिष्ठ विश्लेषण करण्यापूर्वी आपण एक साधा व्यावहारीक प्रश्न उपस्थित करू या.



MNCs आधीपासूनच विकसित देशांमध्ये उत्पादन करत आहेत. एवढंच नाही तर, MNCsची जगभरात अनेक ठिकाणी उत्पादन केंद्र आहेत, जिथून ते स्थानिक बाजारपेठांमध्ये पुरवठा करू शकतात. अशावेळी MNCs भारतात येऊन आपलं उत्पादन केंद्र चालू करून इथून विकसित देशांमध्ये निर्यात करून आपल्याच तिथल्या उत्पादनाला स्पर्धा कशाला करतील? (अर्थात काही MNCs इथल्या स्वस्त श्रमाचा फायदा घेण्यासाठी इथे येतात ते वेगळे. पण त्या थोड्या आहेत.)

MNCs भारतीय उद्योग क्षेत्राला तंत्रज्ञान देण्यास मदत करतील ज्यामुळे निर्यात वाढेल, हा युक्तीवाद तर अजूनच हास्यास्पद आहे. MNCs ह्या काही समाजसेवक नाहीत; भांडवलशाहीला असलं सहकार्य माहीत नाही. "गळेकापू" स्पर्धा हाच तिचा स्थायीभाव आहे.

### 'मुक्त व्यापारा' मागचं खरं कारण : पश्चिमेतील मंदी

विकसित देशांनी भारत सरकारचे हात पिरगळायला सुरुवात केली आणि स्थानिक बाजारपेठा परकीय भांडवलासाठी आणि व्यापारासाठी उघड्या करायला लावल्या त्याचं कारण आपण काही साध्याशा आर्थिक तथ्याने समजून घेऊ. १९७० च्या दशकापासून विकसित राष्ट्रांचा विकासदर कमी होत चालला आहे. सात प्रमुख औद्योगिक राष्ट्रांचा (जी-७, म्हणजेच अमेरिका, जपान, इंग्लंड, पश्चिम जर्मनी, फ्रान्स, इटली आणि कॅनडा) सरासरी वार्षिक आर्थिक विकासदर १९७० च्या दशकात ३.५% होता, तो घसरून १९९० च्या दशकात २.१% वर आला.[३६] त्यांच्या अर्थव्यवस्थांना खिळ बसली आहे. त्यांच्या बहुराष्ट्रीय कंपन्यांजवळ एवढा अमर्याद भांडवलाचा साठा जमा झाला आहे की त्यांच्यासमोर एक नवीन समस्या उभी राहिली आहे - ह्या प्रचंड भांडवलाची गुंतवणूक कुठे करायची? मागणीपेक्षा गुंतवणूक खूपच जास्त झाली आहे. उदा. अमेरिकेत कंपन्यांनी एवढी गुंतवणूक केली आहे की त्यांच्या उत्पादन क्षमतेच्या फक्त ७८% वापरले जातात (२००८ मध्ये).[३७]

दुसऱ्या महायुद्धानंतरचा हा किमान आकडा आहे. म्हणून MNCs भारतात स्थानिक बाजारपेठेसाठी आल्या आहेत, इथून विकसित राष्टांना निर्यात करण्यासाठी नाही. (ह्याला काही अपवाद असू शकतात.)

खरं म्हणजे 'मुक्त व्यापार' नावाची कुठलीच गोष्ट नाही. हा सगळा मूर्खपणा आहे. विकसित देश 'मुक्त व्यापारा'चं तत्वज्ञान भारतासारख्या तिसऱ्या जगातील देशांवर सतत थोपत आहेत, पण ते खुद्द आपल्या देशात अविकसित

देशांकडून स्वस्त किंमतीत होणाऱ्या आयातीवर बंधने घालत आहेत - कारण विकसित देशांना आपल्या बाजारपेठा देशी उद्योजकांसाठी सुरक्षित हव्या आहेत. UNCTAD (युनायटेड नेशन्स ची एक संस्था) च्या एका अहवालाप्रमाणे विकसित देशांनी घातलेल्या संरक्षणात्मक धोरणांमुळे 'विकसनशील' देशांच्या निर्यातीच्या वार्षिक उत्पन्नात शेकडो अरब डॉलर्सचं नुकसान होत आहे.[३८]

जागतिक अर्थव्यवस्थेच्या ह्या ढाच्यामुळे भारतातून होण्याऱ्या निर्यातीला मर्यादा आहेत. आणि दुसऱ्या बाजूला, भारतीय धनदांडग्यांची आयात वस्तूंच्या अमर्यादित हावेमुळे, आयातीवरील निर्बंध उठवल्यानंतर वेगाने वाढत गेली आहे. भारतातील आयातीचे बिल वाढण्याचे एक महत्वपूर्ण कारण म्हणजे चैनीच्या वस्तूंची वाढती आयात, विशेषतः इलेक्ट्रॉनिक वस्तू व सोन्याची आयात. भारतीय भांडवलदारांनी स्वतंत्र भांडवली विकासाचा मार्ग सोडून दिल्यामुळे, आता यंत्रांच्या आयातीतही मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे. तेलाच्या किंमती कितीही वाढल्या तरी तेलाच्या वापर कमी होण्यासाठी सरकार कुठलीही उपाययोजना करत नसल्यामुळे तेलाचे आयात बिलही प्रचंड प्रमाणात वाढत आहे.[३९] तेलाचा खप वाढण्याचे महत्वाचे कारण म्हणजे खाजगी वाहनांमध्ये झालेली प्रचंड वाढ. ह्याला अनेक प्रकारांनी आळा बसू शकला असता - व्यवस्थित नियोजन, सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेला प्रोत्साहन आणि खाजगी वाहनांवर निर्बंध जसं कर वाढवून, पार्कींग दर वाढवून इ. या उलट सरकार मात्र स्वस्त वाहन कर्ज आणि कार उद्योजकांना व कार मालकांना भरघोस अनुदानं देवून मोटारींची विक्री वाढण्यास प्रोत्साहनच देत आहे, आणि सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेचे खच्चीकरण करत आहे.

### म्हणूनच व्यापारातील तूट वाढतेय...

भारत सरकारने WB च्या अटींप्रमाणे आयातीवरील सर्व निर्बंध हटवले आहेत. त्याचबरोबर, भारत सरकार निर्यातवाढीसाठी शर्थीचे प्रयत्न करत आहे. निर्यातदारांना अब्जावधी रुपयांची अनुदाने दिली जात आहेत. ह्यामुळे निर्यातीत थोडेसे वैविध्य आले असले आणि निर्यातीत थोडीशी वाढ झालेली दिसत असली तरी, आयातीमध्ये खूपच मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे. परिणामी **व्यापारातील तूट वाढतच गेली आहे. १९९१-९२ मधल्या २.८ अब्ज डॉलर्स आणि १९९३-९४ मध्ये ४.०५ अब्ज डॉलर्सवरून ती २००७-०८ मध्ये प्रचंड प्रमाणात वाढून ९० अब्ज डॉलर्सवर पोहोचली आहे.**[४०]



इतक्या प्रचंड प्रमाणात व्यापारी तूट असली तरी आपल्या परकीय चलनाची मिळकत आणि खर्चामध्ये असलेली तूट (ह्याला चालू खात्यातील आंतरराष्ट्रीय अर्थव्यवहारांचा ताळेबंद म्हणतात) वाजवी असण्याची दोन कारणे आहेत. पहिलं, सॉफ्टवेअर आणि आय.टी. क्षेत्रातील निर्यात खूपच वाढली आहे. आणि दुसरं, भारताबाहेर कामासाठी गेलेल्या कामगारांनी त्यांच्या इथल्या नातेवाईकांसाठी पाठवलेली विशाल मिळकत. ह्याच मिळकतींनी आत्तापर्यंत भारतीय अर्थव्यवस्था परकीय चलनाच्या दिवाळखोरीपासून वाचवली आहे. सध्याचं जागतिक आर्थिक संकट पाहता ही आवक किती दिवस अजून चालू राहील ह्याबद्दल गंभीर शंका आहे. आम्ही ह्यावर पुस्तिकेमध्ये नंतर चर्चा करू.



चालू अर्थ खात्यातील सततच्या तूटीमुळे भारत सरकारने विदेशी कर्जे घेणे चालू ठेवले आहे. परिणामी **आपले परकीय कर्ज सतत वाढतच गेले आहे. आणि मार्च २००८ ला ते २२१.२ अब्ज डॉलर्स एवढे प्रचंड होते.** (सरकारी आणि गैरसरकारी दोन्ही कर्जांचे आकडे ह्यात समाविष्ट आहेत.)[४१] भारतीय अर्थव्यवस्था परकीय धनकोंनी परकीय चलनाचा पुरवठा केल्यामुळे जरी कोसळली नसली, तरी परिस्थिती १९९१ पेक्षा अधिक गंभीर आहे हे वरील आकडेवारीवरून स्पष्ट होते.

(पण मग, भारताच्या प्रचंड प्रमाणात असलेल्या परकीय चलन भांडाराचं काय? प्रत्यक्षात हे रामायणातल्या मरीच हरणासारखं आहे. ह्याबद्दलही पुढे चर्चा करूया.)

### (ख) मुक्त गुंतवणूक :

### परकीय प्रत्यक्ष गुंतवणुकीसाठी अर्थव्यवस्थेचे दरवाजे उघडे

भारताच्या परकीय धनकोंनी लादलेल्या दुसऱ्या अटीकडे आपण जाऊ. जागतिक बँकेच्या सूचनेनुसार भारतीय शासकांनी आपल्या अर्थव्यवस्थेचे दरवाजे परकीय गुंतवणूकदारांसाठी उघडले आहेत. आता आपल्या चालू खात्यातील तूट भरून काढण्यासाठी भारतीय शासक FDI चा वापर करत आहेत. दुसऱ्या शब्दात, FDI च्या ओघाने परकीय कर्जाची जागा घेतली आहे.

पण जसे कर्जावर व्याज द्यावे लागते, त्याचप्रमाणे परकीय गुंतवणुकीची परिणती नफा बाहेर जाण्यामध्ये होते. MNCs गुंतवणूक करतात ते नफे कमावून परत आपल्या देशात घेऊन जाण्यासाठी. FDI वर परतावा (Returns) जवळजवळ

२० ते २२% होऊ शकतो, असं रिझर्व बँकेचे माजी गव्हर्नर एस.वेंकटरमणही मान्य करतात![४२] (आणि रिझर्व बँकेच्या आकडेवारीनुसार तो ह्याच्यापेक्षाही जास्त आहे.[४३]) ह्याचा अर्थ नफ्याच्या स्वरूपातील ही जावक परकीय कर्जावरील व्याजापेक्षा खूपच जास्त असते. परकीय कर्ज अजून कर्जाची मागणी करतं आणि शेवटी कर्जाच्या विळख्यात अडकवतं; त्याचप्रमाणे, FDI सुध्दा चटक लावते : जितकी जास्त FDI तुम्ही मागवता, तेवढीच जास्त FDI ची गरज नफ्याच्या वाढत्या परताव्यामुळे निर्माण होते.

आपला देश आंतरराष्ट्रीय भिकारी बनला आहे. आपले पंतप्रधान आणि मुख्यमंत्री वॉशिंग्टन पासून टोकियोपर्यंत परकीय गुंतवणूकदारांकडे पैशाची भीक मागत फिरत आहेत.

### FDI ची आवक – नफ्याची जावक याचा परिणाम

'मुक्त व्यापारा'मुळे व्यापारातील तूट मोठ्या प्रमाणात वाढली आहे. 'मुक्त गुंतवणुकी'मुळे नफ्याची जावक मोठ्या प्रमाणात वाढत आहे. देशाचं परकीय चलनाचं संकट गंभीर बनत चालल्यामुळे, अर्थव्यवस्थेला वाचवण्यासाठी परकीय भांडवल म्हणजेच डॉलर्स देशांत आणण्याशिवाय दुसरा पर्यायच नाही. म्हणूनच केंद्रातील किंवा राज्यातील राज्यकर्ते मग ते कुठल्याही रंगाचे असोत - पांढऱ्या, भगव्या, निळ्या, हिरव्या, लाल - परकीय गुंतवणूकदारांना आकर्षित करण्यासाठी विलक्षण सवलती देत आहेत. देशाची पायाभूत मालमत्ता, नैसर्गिक साधनसंपदा, शेतीक्षेत्रं, अगदी 'मानवसंपदा' देखील कवडीमोल किंमतीत विकायला काढली आहे.

साम्राज्यवाद्यांकडे दयामाया नाही. ते अत्यंत अपमानजनक अटी आपल्यावर लादत आहेत. ते आपली सार्वभौमिकता पायदळी तुडवत आहेत. आता आपल्या परराष्ट्र धोरणाची दिशा त्यांच्या हितसंबंधांवर आधारित आहे. त्यांना लुटून नेणे शक्य व्हावे म्हणून कायदेही बदलून त्याच्या बाजूने वळवले जात आहेत. आपलं आर्थिक धोरण, आपलं बजेट, जागतिक बँकेचे अधिकारी बनवतात. १९९१ पासून भारतातील नियोजन मंडळाचे सदस्य, सरकारच्या अर्थखात्याचे सचिव, आर्थिक सल्लागार अशा सर्व नियोजनकर्त्यांनी जागतिक बँकेत नोकरी केलेली आहे. आपल्या आर्थिक धोरणांचे सम्राट मॉन्टेकसिंग अहलुवालिया, यांनी आपल्या कारकीर्दीची सुरुवातीची ११ वर्षे जागतिक बँकेत काढली होती.[४४] साम्राज्यवाद्यांचे साऱ्या जगावर वर्चस्व प्रस्थापित होईल अशा असमान संधीं स्वीकारण्यासाठी



आपल्याला भाग पाडले जात आहे. आशियामध्ये अमेरिकेचं स्वत:चं वर्चस्व स्थापित व्हावं यासाठी आपल्या संरक्षण धोरणामध्ये कायापालट केला जात आहे.

आता ह्या अटींचा भारतीय अर्थव्यवस्थेच्या महत्वपूर्ण क्षेत्रांवर झालेला परिणाम पाहूया.

## भाग चार
## जागतिकीकरणाचे भारतीय अर्थव्यवस्थेवरील परिणाम

### (क) सरकारी क्षेत्रांचं खाजगीकरण

१९९१ पर्यंत देशातील पायाभूत उद्योग मुख्यत: सार्वजनिक क्षेत्रांत होते. सरकार आता त्यांचं खाजगीकरण करत आहे. सरकारी उद्योगांचे खाजगीकरण करणे ही जागतिक बँकेची आर्थिक पुनर्रचना कार्यक्रमा अंतर्गत असलेली एक महत्वाची अट आहे.

### गाजावाजा

स्वत:ला अर्थतज्ज्ञ म्हणवणारे भाट असा जोरदार प्रचार करत आहेत की सरकारी क्षेत्र प्रचंड तोट्यात चालत असल्यामुळे त्यांचं खाजगीकरण करण्यात येत आहे. पण ज्या सरकारी उद्योगांच विशेषकरून खाजगीकरण करण्यात येत आहे, ते तर फायद्यात आहेत! उदा. VSNL, GAIL, टेलिफोन कंपन्या (BSNL, MTNL) आणि प्रचंड फायद्यात असलेल्या विमा आणि तेल कंपन्या.

ह्याचा अर्थ असा नाही की सार्वजनिक क्षेत्रातील कुठलीच कंपनी तोट्यात नाहीये - अनेक आहेत. पण त्याचं कारण हे नाही की सार्वजनिक क्षेत्रं मुळातच अकार्यक्षम असते. 'मुक्त व्यापारा'चे समर्थक मात्र तसा गाजावाजा करतात. खरं कारण हे की राजकारणी आणि नोकरशहांकडून ह्याचा दुभती गाय म्हणून वापर करण्यात आला; आणि सर्वात महत्वाचं म्हणजे सार्वजनिक क्षेत्र अशाप्रकारे चालवलं गेलं की खाजगी क्षेत्राच्या नफ्याची भरभराट झाली.

खाजगीकरण पंडितांचा हुकमी एक्का - राज्य वीज मंडळ - ह्याचा आधार घेऊन हे समजून घेऊ या. वीजक्षेत्र हे अर्थव्यवस्थेच्या सगळ्यात महत्वाच्या क्षेत्रांमधील एक आहे. आणि १९९१ पर्यंत जवळजवळ पूर्णपणे सार्वजनिक

क्षेत्राच्या ताब्यात होते. ह्याच्या तोट्यात जाण्याचं एक महत्वाचं कारण म्हणजे वीजेची किंमत जाणीवपूर्वक कमी ठेवण्यात आली होती - आता जेव्हा त्याचं खाजगीकरण करण्यात आलं आहे तेव्हा वीजेच्या किंमती दुपटीने/तिपटीने वाढवल्या जात आहेत, म्हणजे खाजगी क्षेत्र खोऱ्याने पैसा कमाऊ शकतात. दुसरं महत्वाचं कारण म्हणजे राज्य वीज मंडळाचे सर्वात मोठे उपभोक्ते खुद्द राज्यसरकारे आणि मोठमोठे उद्योगपती आहेत जे बिलं भरतच नाहीत.[४५] शेवटी, राज्य विद्युत मंडळाच्या या संकटात भर पडते ती मंत्री आणि शासकीय अधिकारी यांच्या अतोनात भ्रष्टाचारामुळे. खाजगीकरण हे जर भ्रष्टाचाराला पर्याय असेल, तर मग सर्वात प्रथम आपल्या मंत्रीमहोदय आणि नोकरशहांचं खाजगीकरण करायला पाहिजे.

ह्याचा अर्थ असा नाही की सार्वजनिक क्षेत्रातील कर्मचाऱ्यांमध्ये अकार्यक्षमता अथवा भ्रष्टाचार नाहीये. जर ते नसते, तरच आश्चर्य! शेवटी ज्या देशाचे सर्वोच्च नेते हजारो कोटी रुपयांच्या गैरव्यवहारात आणि भ्रष्टाचारात आकंठ बुडलेले आहेत आणि तरीही ते न्यायसंस्था आणि पोलीस यांना आपल्या बोटावर नाचवून मुक्तपणे फिरू शकतात, तेथील सर्वसामान्य कर्मचाऱ्यांना खडतर परिश्रमाची आणि प्रामाणिकपणाची नैतिक प्रेरणा कुठून मिळणार ? वरील विस्तृत युक्तिवादातून आम्हाला एवढेच सांगायचे आहे की वीजक्षेत्र खाजगीकरणाचा खरा उद्देश सार्वजनिक क्षेत्राची दुखणी दूर करण्याचा नाही, तर तोटा, भ्रष्टाचार आणि अकार्यक्षमतेची कारणे दाखवून हे सार्वजनिक संपत्ती खाजगी कंपन्यांना विकणे आणि त्यांना भरमसाठ नफा कमावण्यासाठी रान मोकळे करणे हाच आहे.

**खाजगीकरण : कवडीमोल किंमतीत**

विदेशी डाकू भारतीय उद्योगांमधील केंद्रीय क्षेत्रांवर नियंत्रण ठेवू इच्छितात. भारतीय बड्या उद्योगसमूहांना देखील (बहुतेकदा) वाहत्या गंगेत हात धुवून घ्यायला मिळत आहेत. स्वातंत्र्याच्या काळात भारतीय भांडवलदारांकडे पायाभूत उद्योग उभे करण्यासाठी पैसा नव्हता, म्हणून त्यांच्याच सूचनेवरून सर्व पायाभूत उद्योग सार्वजनिक क्षेत्रांत उभारले गेले. पण आता, भारतीय भांडवलदार मोठे बनले आहेत आणि ते ह्या क्षेत्रांत गुंतवणूक करायला तयार आहेत.





ह्या महाकाय कॉर्पोरेशन्सची खुलेआम दलाली करून, ह्या देशाचे शासक, राजकीय पक्ष आणि नोकरशहा यांनी आपला खरा रंग दाखवायला सुरुवात केली आहे. ते, गेल्या ५० वर्षांत जनतेच्या घामाच्या पैशातून उभ्या केलेल्या सार्वजनिक क्षेत्रांचं खाजगीकरण करत आहेत, एवढंच नाही तर, नफाखोरी करणाऱ्यांना कवडीमोल किंमतीत विकूनही टाकत आहेत. ह्याची दोन चकित करणारी उदाहरणे घेऊ.

अल्यूमिनियमचं उत्पादन करणारी बाल्को नावाची विशालकाय सार्वजनिक कंपनी ज्याच्या मालमत्तेची किंमत ५००० कोटी रुपये होती, ती कंपनी स्टरलाइट नावाच्या पर्यावरणाला धोका पोहोचविणाऱ्या व सुरक्षिततेच्या बाबतीत कुप्रसिद्ध असणाऱ्या कंपनीला फक्त ५५० कोटी रुपयाला विकली. बाल्कोच्या स्वत:च्या वीजघराची किंमत ह्याच्या दुप्पट होती![४६] VSNL ही दूरसंचार कंपनी टाटाला फक्त २५९१ कोटी रुपयांना दिली गेली. VSNLचा रोख निधीच ३००० कोटी रुपये होता. त्याशिवाय VSNL ची सर्व प्रमुख शहरांमध्ये मालमत्ता होती, ती हिशोबात घेतली तर त्याची किंमत हजारो कोटी रुपये होईल. ह्यावर कळस म्हणजे VSNL खरेदी करण्यासाठी पैसे सुद्धा टाटाला सार्वजनिक क्षेत्रातल्या वित्तीय संस्थेने कर्ज म्हणून दिले.[४७]

**खाजगी मक्तेदारी - अवाढव्य नफा**

'मुक्त व्यापारा'चे समर्थक असा दावा करतात की मक्तेदारी असल्यामुळे सार्वजनिक क्षेत्रं तोट्यात असतात – त्यांना सरकारी पाठबळ असते, त्यांना बाजाराचे कायदे नसतात आणि त्यांना स्पर्धाही नसते. पण जर ह्या क्षेत्रांची खाजगी मक्तेदारी झाली, आणि मग ते अवाढव्य नफा कमाऊ लागले, तर मात्र त्यांना काही अडचण नाही.

खरंतर अनेक पायाभूत क्षेत्रं मक्तेदारीतच असू शकतात. कारण त्यामध्ये प्रचंड मोठी गुंतवणूक असते. उदा. वीजवितरणाचे जाळे उभे करणे किंवा रेल्वे व एक्स्प्रेस हायवे बांधणे ही प्रचंड खर्चाचीच कामे आहेत. जर स्पर्धेसाठी वीजवितरणाची दोन समांतर जाळी उभी केली किंवा दोन शहरांच्या मध्ये दोन रेल्वे लाइन किंवा दोन एक्स्प्रेस हायवे बांधले, तर गिऱ्हाइके वाटली गेल्यामुळे, सर्व स्पर्धा करणाऱ्या कंपन्या दिवाळखोर होतील. म्हणूनच भारतात जिथेजिथे वीजवितरणचे खाजगीकरण झालेलं आहे, तिथेतिथे ते एकाच खाजगी कंपनीला देण्यात आले आहे. म्हणजे सार्वजनिक क्षेत्रातील मक्तेदारी आता खाजगी मक्तेदारी झाली

आहे. तसेच खाजगी क्षेत्राने बांधलेला प्रत्येक एक्स्प्रेस हायवे त्या त्या खाजगी कंपनीची मक्तेदारी आहे. आता खाजगी क्षेत्रं अवाढव्य नफे, मक्तेदारी नफे कमाऊ शकतात - वास्तविक पाहता ह्या क्षेत्रांच्या खाजगीकरणाची ही खरी कारणं आहेत.

दुसरं म्हणजे जिथे स्पर्धा शक्य आहे जसं स्टील निर्मिती, विमा, खाणी किंवा वीजनिर्मिती, तिथे ज्या महाकाय कंपन्यांनी ही क्षेत्रं ताब्यात घेतली आहेत, तिथे त्या किंमतीयुद्ध करत नाहीत (म्हणजे किंमती कमी न करण्याचा अलिखित नियम पाळतात). उलट, आपसात संगनमत करून (cartel किंवा संघ बनवून) किंमती फुगवतात व 'सुपर प्रॉफिट' कमावतात.

अगदी हेच भारताच्या वीजनिर्मितीच्या खाजगीकरणाबाबत घडत आहे. भारतीय आणि परकीय कंपन्यांनी संघ बनवून विजेच्या किंमती अस्मानाला नेऊन पोहोचवल्या आहेत. MSEB ने आपले वीजनिर्मितीचे कारखाने स्थापित करण्याची योजना रद्द केली, म्हणून त्यांना आता वीजेची कमतरता जाणवू लागली आहे. आता जेव्हा MSEB ला ह्या खाजगी कंपन्यांकडून वीज विकत घ्यावी लागत आहे तेव्हा ह्या कंपन्यांनी प्रचंड महाग म्हणजे ८ ते १० रुपये युनिट एवढी किंमत सांगितली आहे.[४८]

सिमेंट आणि स्टीलच्या बाबतीत तर ज्या महाकाय कंपन्यांचं ह्या क्षेत्राच्या उत्पादनावर नियंत्रण आहे, त्यांनी अलिकडच्या वर्षांत किंमती इतक्या वाढवल्या आहेत की ही वर्तमानपत्रांची ठळक बातमी बनली. एरवी अत्यंत पोचट असलेल्या आपल्या अर्थमंत्र्यांना सुध्दा त्याची दखल घ्यावी लागली.[४९]

## (ख) खाजगी कॉरपोरेट क्षेत्राची भरभराट

ह्या महाकाय परकीय कंपन्यांना आणि त्यांच्या भारतीय भागीदारांना खूली लूट करण्यासाठी आणि प्रचंड नफा कमावण्यासाठी सरकारच मदत करत असल्यामुळे त्यांची दिवाळीच झाली आहे. गेल्या ५ वर्षांत, २००३-०४ ते २००७-०८ ह्या कालावधीत, अर्थव्यवस्थेमध्ये झालेली उल्लेखनीय ८% पेक्षा जास्त वाढ ही पूर्णपणे खाजगी क्षेत्रात झालेल्या वाढीचं प्रतिबिंब आहे.

पण, दारिद्रयात जगणाऱ्या बहुसंख्य लोकसंख्येची खरेदी क्षमता वाढवण्यासाठी सरकारने दाखवलेली अनास्था जर विचारात घेतली तर, ही



वाढ कशामुळे झाली? उच्चभ्रूंच्या सरकारने GDP चा विकास दर वाढवण्यासाठी कोणती पावले उचलली आहेत ते आपण पाहू या.

### १) भरभराटीचे विकृत स्वरुप

मिल्टन फ्रेडमन, बहुराष्ट्रीय कंपन्यांचे फितुर आणि त्यांचे कर्तव्यदक्ष भारतीय प्रतिनिधी ह्यांच्या अर्थशास्त्राप्रमाणे मोठमोठया उद्योगांची भरभराट म्हणजेच अर्थव्यवस्थेची भरभराट. जेव्हा त्यांच्या वस्तू बाजारात विकल्या जातील तेव्हाच त्यांचा नफा होईल. भारताच्या लोकसंख्येचा छोटासा हिस्साच ह्या उद्योगधंद्यांचा बाजार आहे. त्यांना हव्या त्या वस्तू घेण्याची क्रयशक्ती ह्या छोट्याशा हिश्शामधेच आहे. म्हणूनच भारत सरकार सामान्य माणसांवर त्याचा काय परिणाम होईल ह्याचा जराही विचार न करता बड्या उद्योगांच्या नफ्यामध्ये वाढ होईल अशा विक्षिप्त उद्योगांना प्रोत्साहन देत आहे. वरील मीमांसेवरून हाच निष्कर्ष निघतो की २००४–०८ ह्या वर्षांमधील भरभराट खूपच संकुचित पायावर आधारित होती.

**चैनीचे उद्योग:** चैनीच्या वस्तूंच्या उद्योगामध्ये खूपच मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे, जसं - विमानकंपन्या, मोटरगाड्या, महाग मोबाईल उपकरणे, विविध प्रकारची इलेक्ट्रॉनिक उपकरणे, पडदे-गालिचे, डिझायनर कपडे, मॉलस्, पंचतारांकित हॉटेलस्, दागदागिने, आर्ट गॅलरिज, इ.. अतिशय चैनीचे उद्योग, ज्यांची उत्पादनं फक्त धनदांडगेच घेऊ शकतात, त्याच्या विक्रीतही भरभराट आली आहे - २ ते ५ कोटी डॉलर्सची खाजगी जेट विमाने, २ ते ५ कोटी रुपयांच्या विलासदायी गाड्या, टुमदार गृहप्रकल्प, वगैरे वगैरे.



**वैद्यकीय पर्यटन:** विदेशी नागरिकांना पंचतारांकीत उपचारांसाठी कॉर्पोरेट रुग्णालये झपाट्याने वाढत आहेत. २००५ मध्ये १.७५ लाखांपेक्षा जास्त वैद्यकीय प्रवासी भारतात येऊन गेले; CII च्या अहवालाप्रमाणे हा उद्योग लवकरच २३,००० कोटी रुपयांचा होईल. अलिकडे, दातांच्या चिकित्सेसाठीही परकीय पर्यटन वाढू लागले आहे.[५०]

**चिकित्सकीय संशोधन:** MNCs अष्टपैलू आहेत; भारतीय अर्थव्यवस्थेच्या भरभराटीसाठी भारतातील गरिबांचा हातभार कसा लागेल हे त्यांनी शोधून

काढलं आहे - नवीन औषधांच्या चाचण्यांसाठी देह भाड्याने देणे. भारताला चिकित्सकीय संशोधनासाठी जगातील सर्वात मोठी प्रयोगशाळा बनवायला सरकारने हिरवा झेंडा दाखवला आहे. शिवाय ह्या उद्योगाला करमुक्तही केलं आहे.[५१] भारतात मरण स्वस्त आहे. नवीन औषधांच्या चाचण्यांमध्ये माणसं मेली, तरी थोडीशी नुकसानभरपाई देऊन सुटका होते. विख्यात सल्लागार कंपनी ए.टी.किअर्नेच म्हणणं आहे की भारतीय जनतेच्या साधेपणामुळे जागतिक औषध उद्योगाची औषधांवरील प्रयोगांसाठी भारत ही आवडती जागा आहे. तसं केल्यामुळे ते आपला ६०% खर्च वाचवू शकतात. म्हणून MNCs भारताकडे धाव घेत आहेत.[५२] २०१० सालापर्यंत ह्या क्षेत्रात २ अब्ज डॉलर्सची गुंतवणूक अपेक्षित आहे.[५३]

**लुटारु भांडवलशाही:** ओरिसा, झारखंड, छत्तीसगड ह्या राज्यांमधील आदिवासी जिल्हे देशाच्या बहुसंख्य नैसर्गिक संपत्तीचे भांडार आहेत. ह्या राज्यांमधले लोक हुकूमशाही दहशतवादाच्या छायेखाली जगत आहेत. लोकांना बंदुकीच्या धाकावर त्यांच्याच जमिनीवरून हाकलून दिलं जात आहे, आणि त्यांच्या जमिनींवर कब्जा करून, त्यांची जंगले तोडून, हजारो एकर जमिनी विदेशी आणि देशी कंपन्यांना सुपूर्द केल्या जात आहेत. त्यावर ह्या कंपन्या स्टील, लोखंड, अल्यूमिनियमचे विशालकाय कारखाने आणि खाणप्रकल्प उभे करत आहेत. स्थावर मालमत्तेचे सट्टेबाजही ह्या जमिनी हडपण्यात सामील आहेत - त्यावर आय.टी. पार्क, गोल्फ मैदाने, पंचतारांकीत हॉटेल्स बांधण्यासाठी. लाखो करोडो रुपयांची गुंतवणूक ह्या गरीब पण 'श्रीमंत' राज्यांमध्ये होईल अशी अपेक्षा आहे.



**शहरी स्थावर मालमत्ता:** ह्या देशामध्ये कोट्यवधी डॉलर्सची परकीय थेट गुंतवणूक शहरांमधील हॉटेल्स, विमानतळ, मॉल्स, उड्डाणपूल आणि यासारख्या इतर बांधकाम उभारणीसाठी येऊ शकते. ह्यामध्ये भरपूर नफा आहे. भारतातल्या अनेक महानगरांमध्ये स्थावर मालमत्ता भाड्याने घेण्यामध्ये झपाट्याने वाढ झाली आहे. अमेरिकन वित्तीय कंपन्या ह्या क्षेत्रांत गुंतवणूक करायला अतिशय उत्सूक असल्याचे त्यांनी दर्शविले होते. मुंबईचंच उदाहरण - अमेरिकेतील 'मॅककिनसे' ह्या सल्लागार कंपनीने शिफारस केली आहे की शहराच्या पायाभूत घटकांमध्ये जर अमूलाग्र बदल केले तर शहर आंतरराष्ट्रीय वित्तीय केंद्र बनू शकते.[५४] पण



त्यासाठी जमिनी तर हव्यात. त्या कुठुन येतील? धनदांडग्यांच्या महालांना तर हात लावू शकत नाहीत. मग पर्याय एकच आहे. शहरातल्या गरिबांना हुसकून लावायला लागेल. गरिबांची चिंता करण्याची काहीच गरज नाही कारण त्यांची खरेदीक्षमता कमी असल्यामुळे ते देशाच्या विकासदरात काहीच भर घालत नाहीत. त्यामुळे शहरांतल्या गरिबांच्या झोपड्या आता जमीनदोस्त करण्यात येत आहेत. **शहरं आता फक्त श्रीमंतांसाठी राखीव करण्यात येत आहे.**

**विशेष आर्थिक क्षेत्र (Special Economic Zones किंवा SEZs)**

हे तर एक लफडंच आहे. परकीय गुंतवणूकदारांना 'आंतरराष्ट्रीय स्पर्धात्मक उद्योग वातावरण' उपलब्ध करून देण्याच्या नावाखाली विशेष आर्थिक क्षेत्रात तऱ्हेतऱ्हेच्या आश्चर्यकारक सवलती देण्यात येत आहेत - आयात शुल्क नाही, आयातीवर कुठलेही निर्बंध नाहीत, नफ्याच्या परताव्यावर काही निर्बंध नाहीत, ५ ते १० वर्षे पूर्ण करमाफी, SEZs च्या ७५% जागेवर हॉटेल्स, गृहप्रकल्प, मोठमोठे मॉल्स, गोल्फ मैदाने इ. बांधायला परवानगी.[५५] अर्थखात्यानुसार ह्या कर सवलतींमुळे पुढील चार वर्षांच्या काळात सरकारच्या उत्पन्नात ९० हजार करोड रुपयांचं नुकसान होणार आहे.




ह्या क्षेत्राला कुठलेही कामगार कायदे आणि पर्यावरणाचे कायदे लागू नाहीत. ह्या क्षेत्राचा विकासआयुक्त तिथला हुकूमशहाच असेल[५६] – त्याच्या सीमेवर लोकशाहीचा अंत होईल.

प्रसिद्ध इतिहासकार व लेखक सुमीत सरकार म्हणतात की, "आधुनिक भारताच्या इतिहासातील हा एक सर्वात मोठा जमिनींचा घोटाळा आहे. हजारो एकराच्या शेतजमिनींचा खाजगी उद्योगांसाठी वापर या प्रसंगाचा भारत किंवा इतर कोणताही प्रगत देश प्रथमच साक्षीदार असेल."[57] अगदी आत्तापर्यंत, सरकारच या विशेष आर्थिक क्षेत्रासाठी जबरदस्तीने शेतकऱ्यांच्या जमिनी बळकावत होते. त्याही बाजारभावापेक्षा खूपच कमी पैसे देऊन - नंदीग्राममध्ये शेतकऱ्यांनी केलेल्या वीरोचित संघर्षाने जमीन संस्थापनाचा कायदा बदलण्यास सरकारला भाग पाडले.

## २) खाजगी क्षेत्रांना उघड उघड अनुदानं

राजकीय पक्षांनी संपूर्ण जनतेच्या फायद्यासाठी देशावर राज्य करण्याचं नाटक करणं सोडून दिलयं. ते उघडपणे फक्त औद्योगिक घराण्यांच्या फायद्यासाठी अर्थव्यवस्था चालवत आहेत. आपण वर पाहिलचं आहे, की ते सार्वजनिक क्षेत्रं खाजगी उद्योगांना कवडीमोल किंमतीत देऊन टाकत आहेत. ग्राहकोपयोगी वस्तू आणि बांधकाम व्यवसायाची भरभराट व्हावी म्हणून सार्वजनिक बँकांना हजारो कोटी रुपयांचं कर्ज देण्यास भाग पाडले आहे. गरिबांच्या घरांवर बुलडोझर चालवून त्यांना हाकलून दिलं जात आहे; म्हणजे धनदांडगे त्या मालमत्तेवर गुंतवणूक करू शकतील. जमिनीखाली असलेल्या नैसर्गिक संपत्तीवर कंपन्यांना ताबा मिळवता यावा म्हणून सरकारी गुंडांकरवी गावच्या गावं खाली केली जात आहेत.

'सार्वजनिक क्षेत्रातील पैसा कॉर्पोरेट क्षेत्राला हस्तांतरीत करणारं मंत्रालय' (वित्त मंत्रालय म्हणूनही हे ओळखल जातं) हे जनतेचा पैसा खाजगी क्षेत्राकडे वळवण्यासाठी रोज नवनवीन कल्पना घेऊन येत असते.

एक साधा मार्ग म्हणजे थेट अनुदानं देणं. अर्थात 'अनुदानं' फक्त गरिबांना दिली जातात, म्हणून याला 'प्रोत्साहन' म्हटलं जातं. निर्यातदारांना दिलेल्या अनुदानाला 'निर्यात प्रोत्साहन योजना' (Export Promotion Scheme) असं म्हणतात : २००५-०६ मध्ये ही रक्कम ४०,००० कोटी रुपये होती.[५८] मोठमोठ्या उद्योगांना पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी कर सवलती, जकात करात सवलती, स्वस्त वीज, स्वस्त जमिनी, कर्जमाफी अशा प्रकारचे असंख्य मार्ग शोधून अनुदानं देण्यात येत आहेतं. आपल्या राज्यात बड्या उद्योगांनी गुंतवणूक करावी ह्यासाठी राज्य सरकारांमध्ये त्यांना अनुदान देण्यासाठी स्पर्धाच चालू आहे. त्यांना जमीन, पाणी, वीज, आणि इतर पायाभूत सुविधा अनुदानित दरांमध्ये पुरवल्या जात आहेत.[५९] 'नॅनो'साठी टाटाला पश्चिम बंगाल सरकारने ८५० कोटी रुपये अनुदान दिलं होतं[६०]; आता मोदीने टाटाला स्वस्तात जमीन, स्वस्तात वीज आणि कोणास ठाऊक अजून काय काय पायाभूत सुविधा, शिवाय ९५७० कोटी रुपयांच कर्ज तेही फक्त ०.१% सरळ व्याजाने दिलं आहे - कारखाना उभा करण्यासाठी लागणाऱ्या रकमेच्या तिप्पट! ही बातमी गुप्त ठेवण्यात आली होती, आणि ती फुटल्याबरोबर मोदीने चौकशीचे आदेश जारी केले.[६१]



धनदांडग्यांना आडवळणाने अनुदानं देण्याचे प्रकारही शोधले गेले आहेत. सरकार परकीय आणि भारतीय उद्योगांना पायाभूत सुविधांमध्ये (वीज, रेल्वे, रस्ते, बंदरे, विमानतळे, सिंचन, ग्रामीण आणि नागरी पाणी पुरवठा, इ.) गुंतवणूक करण्यासाठी सार्वजनिक-खाजगी भागीदारीचा (Public-Private Partnership किंवा PPP) प्रस्ताव देत आहे. इकडे तर सरकार खाजगी गुंतवणूकदारांना त्यांच्या गुंतवणुकीवर फक्त किमान नफ्याची हमीच देत नाही, तर त्यांना गुंतवणुकीला लागणारा पैसाही सवलतीच्या दराने मोठ्या कालावधीसाठी कर्जरुपाने देण्यात येत आहे.[६२] व्वा! काय भागीदारी आहे !!

## ३) धनदांडग्यांच्या चंगळवादाला प्रोत्साहन

२००४-०८ ह्या काळातील विकासदराच्या वाढीच एक महत्वपूर्ण कारण धनदांडगे आणि मध्यमवर्गाच्या उपभोगात भरघोस वाढ होती.

ही मागणी कुठून आली? मीडिया आणि अनेक बुध्दीवादीसुद्धा, जागतिकीकरणामुळे भारतीय मध्यमवर्ग मोठ्या प्रमाणात वाढल्याचा दावा करतात. तो वाढून आता २० ते २५ कोटी झाला आहे असं त्यांचं म्हणणं आहे. पण हे अशक्यच आहे. NCEUS च्या मते तीन चतुर्थांशपेक्षा जास्त लोक रोजच्या २० किंवा यापेक्षाही कमी रुपये कमाईवर जगतात.[६३] NSS च्या २००४-०५ च्या अहवालानुसार ८९% पेक्षा जास्त लोक दिवसाला ३७ रुपयांपेक्षा कमी खर्च करतात.[६४] अर्थातच मध्यमवर्ग आणि श्रीमंत हे २० ते २५ कोटी असूच शकत नाहीत.



मग भारतीय मध्यमवर्ग आहे तरी किती? NSS च्या २००४-०५ च्या आकडेवारीप्रमाणे रोज ९३ रुपये खर्च करणारा मध्यमवर्ग हा लोकसंख्येच्या फक्त ४% आहे. त्यात धनदांडग्यांची संख्या मिळवली, जे लोकसंख्येच्या २% आहेत, तर दोन्ही मिळुन ६% होतात.[६५] 'मॅककिनसे' ह्या आंतरराष्ट्रीय सल्लागार कंपनीने ह्याला अजूनच पुष्टी दिली आहे. त्यांच्या अंदाजानुसार भारतीय मध्यमवर्ग ५ कोटी किंवा लोकसंख्येच्या ५% पेक्षाही कमी आहे.[६६]

जरी भारताच्या लोकसंख्येच्या मानाने हा आकडा लहान दिसत असला, तरी एकूण संख्या विचारात घेतली तर हा खूप आहे. गेल्या काही वर्षांमध्ये भारतीय शासकांनी ह्या मध्यमवर्ग, श्रीमंत आणि धनदांडग्यांना लागणाऱ्या वस्तू

आणि सेवांमध्ये भरभराट उत्पन्न करण्यासाठी अनेक योजना आखल्या. ह्याने एका औद्योगिक भरभराटीला जन्म दिला. गेल्या ५ वर्षांतील, २००३-०४ ते २००७-०८ मधील भारतीय अर्थव्यवस्थेच्या भरभराटीचे हे एक महत्वपूर्ण कारणं आहे. भारतातील अधिकांश लोक अतिशय हलाखीच्या परिस्थितीत राहतात. ह्या लोकांची क्रयशक्ती न वाढवता येणारी भरभराट शाश्वत असू शकत नाही. पण जागतिकीकरणाच्या आजच्या काळात शासक वर्गाला अर्थव्यवस्थेच्या शाश्वत विकासात रस नाही. ते कमीत कमी वेळात जास्तीत जास्त नफा कमावू इच्छितात.

यासाठी सरकारने कुठली धोरणे अवलंबली ते आता पाहू या.

■ त्यांच्या मोठ्या भावाने - अमेरिकेने - निर्माण केलेल्या कृत्रिम भरभराटीपासून शिकून भारतीय शासकांनी सुध्दा मध्यमवर्गाला आणि श्रीमंतांना कर्ज वाटण्याची बँकांना पराणी लावली. परिणामी, वैयक्तिक कर्जाची रक्कम २०००-०१ च्या १२.२% च्या तुलनेत २००६-०७ मध्ये दुपटीने वाढून २२.३% झाली.[६७] बँक कर्जामध्ये झालेली प्रचंड वाढही मुख्यत्वेकरून २००२ नंतरच्या औद्योगिक वाढीचं कारण आहे. त्याने औद्योगिक भरभराटीस अनेक प्रकारे मदत केली:



- २००७ मध्ये ५०% पेक्षा जास्त वैयक्तिक कर्ज ही गृहकर्ज होती.[६८] त्यामुळे गृहप्रकल्प आणि स्थावर मालमत्तेच्या गुंतवणुकीत मोठी वाढ झाली. परिणामी बांधकामाला लागणाऱ्या सामानाच्या मागणीतही वाढ झाली.
- स्थावर मालमत्तेच्या भरभराटीमुळे इतर उद्योगांच्या मागणीमध्येही वाढ झाली. म्हणजे, सिमेंट, स्टील, टाइलस्, काच, लिफ्टस्, पंखे, वातानुकूलित यंत्रे, फर्निचर इ.इ.
- त्याचबरोबर बँकांनी कर्जासारखीच आणखी एक योजना पुढे आणून चंगळवादाला प्रोत्साहन दिले, ती म्हणजे क्रेडिट कार्डवर कर्ज. २००७-०८ मध्ये क्रेडिट कार्डावर झालेला एकूण व्यवहार ५८००० कोटी रुपयांचा होता, गेल्या वर्षीच्या तुलनेत ४०% अधिक.[६९]
- शेवटी, अत्यंत महत्वाचं म्हणजे, ह्यांनी ऑटोमोबाईल क्षेत्राची भरभराट चालू केली. २००६- ०७ मध्ये खरेदी केलेल्या नवीन गाड्यांपैकी ८९% गाड्या कर्जावर खरेदी केलेल्या आहेत. त्यावर्षी बँकांचे गाड्या आणि दुचाकींना दिलेल्या कर्जापैकी न फेडलेले कर्ज १,०९,००० कोटी रुपये होते.[७०]



- ग्राहकोपयोगी आणि ऑटोमोबाईल उद्योगांमध्ये आलेली भरभराट त्यांना लागणाऱ्या धातू आणि रासायनिक उद्योगांपर्यंतही पोहोचली.

■ गृहप्रकल्प आणि ऐयाषीच्या वस्तूंमध्ये झालेल्या भरभराटीला अजून मदत मिळाली शेअरबाजाराच्या भरभराटीची. अर्थातच ही देशात आलेल्या सट्टेबाज भांडवलामुळेही झाली होती. (आपण ह्याची भाग ४ मध्ये चर्चा करू). भारतात येणाऱ्या निव्वळ सट्टेबाज भांडवलामध्ये २००३ पासून मोठ्या प्रमाणात वाढ व्हायला सुरुवात झाली. २००३ ते २००६ पर्यंत ह्याचा ओघ सरासरी ९ अब्ज डॉलर्स प्रतिवर्षी होता. अचानकपणे तो २००७ च्या पहिल्या दहा महिन्यात १८.६ अब्ज डॉलर्स एवढा झाला. ह्या पैशाच्या आवकीने शेअरबाजाराला वेडच लावलं.[७१] १८ महिन्यांपेक्षा कमी कालावधीत सेन्सेक्स दुप्पट झाला २१ जून २००६ ला शेअरबाजार बंद होताना असलेल्या १०,००० वरून ११ डिसेंबर २००७ ला २०,००० पेक्षा जास्त वर बंद झाला. (म्हणूनच २००८ मध्ये जेव्हा सट्टेबाज भांडवलदारांनी आपली गुंतवणूक बाहेर काढायला सुरुवात केली, तेव्हा शेअरबाजार कोसळला).[७२] मीडिया आणि सरकार कितीही ओरडून सांगत असले तरी ह्या वाढलेल्या सेन्सेक्सचा भारतीय अर्थव्यवस्थेच्या बळकटपणाशी काहीही संबंध नाही. एवढंच झालं की मोठ्या प्रमाणात कृत्रिम पैसा निर्माण झाला, जो शेअरबाजार कोसळला तर नाहीसा होईल. पण दरम्यान जोपर्यंत सगळं ठीक चाललं होतं, तोपर्यंत मध्यमवर्गाची आमदानी वाढत होती. शेअरबाजाराच्या भरभराटीमुळे ते इतके अत्यानंदात होते, की अगदी स्वतःची बचतही शेअरबाजारात गुंतवत होते. त्यांच्या कमाईच्या ह्या तात्पुरत्या वाढीनेही चंगळवादाला उत्तेजन मिळाले.



■ कर्जावरील ऐयाषीच्या वस्तूंच्या खरेदी व्यतिरिक्त निर्यातीनेही औद्योगिक वाढीस प्रोत्साहन दिलं. गेल्या काही वर्षात, भारताच्या कापड, चामडं, हिरे, दागिने, ह्या पारंपरिक निर्याती व्यतिरिक्त त्यात थोडी विविधता आली आहे. आता रसायने आणि इंजिनिअरींग वस्तूंच्या निर्यातीतपण वाढ झाली आहे.

भारताचा स्थानिक बाजार सीमित असल्यामुळे, औद्योगिक उत्पादनातील वाढ ही फक्त निर्यातीवरच निर्भर असू शकते. पण ह्या प्रकारची वाढ हे स्वस्थ अर्थव्यवस्थेच लक्षणं नाही, हे विकृत वाढीचं लक्षण आहे.

## (ग) छोट्या उद्योगधंद्यांची पडझड



लघुउद्योगांना प्रोत्साहन देण्यासाठी भारत सरकारने काही विशिष्ट उत्पादने लघुउद्योगांसाठी राखून ठेवली होती. जसं - टूथपेस्ट, चपला/बूट, कपडे, आइस्क्रीम इ. आणि म्हणून ह्या उद्योगांनी झपाट्याने आपला विस्तार करून देशाच्या औद्योगिक क्षेत्रातं महत्वपूर्ण जागा निर्माण केली. एकूण औद्योगिक कारखान्यांमध्ये ९५% कारखाने लघु उद्योग आहेत. यांत्रिक उत्पादनाच्या ४९% उत्पादन आणि ८०% रोजगार ह्या क्षेत्रामध्ये होते. देशाच्या निर्यातीपैकी ३४% निर्यात ह्या क्षेत्रामधूनच होते.[७३] लघुउद्योगांच्या २००१-०२ मध्ये केलेल्या तिसऱ्या सर्वेक्षणानुसार ह्या क्षेत्रामध्ये जवळजवळ एक करोड कारखाने होते (नोंदणी झालेले व न झालेले मिळून) व ह्यात अडीच करोड लोक काम करत होते.[७४] शेतीक्षेत्रानंतरचे हे देशातील दुसरे महत्वपूर्ण क्षेत्र आहे.

परकीय कंपन्यांच्या दबावाला बळी पडून ह्या क्षेत्रातील आरक्षण एकूणात समाप्त केले आहे. ह्या क्षेत्राला मिळणाऱ्या सवलतीच्या व्याजदरातील कर्जेही हळूहळू बंद केली जात आहेत.[७५] आणि म्हणून, काही निर्यातभिमुख क्षेत्रं आणि खाजगी उद्योगांच्या उपकंपन्या सोडल्या तर हे क्षेत्रं मरायला टेकले आहे. लाखो लघुउद्योगांना आपले कारखाने बंद करण्यावाचून गत्यंतरच उरलेले नाही. लघुउद्योगांच्या तिसऱ्या सर्वेक्षणाने ज्या २२.६ लाख नोंदणीकृत कारखान्यांचे सर्वेक्षण केले त्यापैकी ३९% कारखाने बंद पडले होते आणि जवळपास ४० लाख कामगार बेरोजगार झाले होते.[७६] त्याशिवाय १५% कारखाने आजारी पडले होते.[७७] अलिकडे आलेल्या आर्थिक मंदीमुळे ह्या क्षेत्रावर खूप मोठा परिणाम झाला : २००७-०८ मध्ये एक लाख चौदा हजार कारखाने आजारी पडले होते.[७८] जागतिकीकरण विकास नाही, तर देशाच्या औद्योगिकरणाचा ऱ्हास करत आहे.



## (घ) असंघटीत क्षेत्रांवर होणारे परिणाम

देशातील एकूण कामगार संख्या ४५.९ कोटी आहे. त्याच्या फक्त ६% पेक्षा कमी म्हणजे २.६ कोटी कामगार संघटित क्षेत्रांत आहेत (NSS च्या २००४-०५ च्या सर्वेक्षणानुसार).[७९] भारतीय कामगारांच्या संख्येतील फार मोठा भाग हा असंघटित क्षेत्रांत काम करतो. ह्यामध्ये जेमतेम पोटापुरते कमावणारे शेतकरी, शेतमजूर, कोळी, गवळी तसेच पारंपरिक कारागीर, हातमाग विणकर इ. आहेत. जागतिकीकारणामुळे या लाखो करोडो लोकांच्यापुढे जीवनमरणाचा प्रश्न निर्माण झाला आहे.

पारंपरिक उद्योगातील सर्वात मोठं क्षेत्रं असलेल्या हातमाग विभागात अंदाजे एक ते दोन कोटी लोक प्रत्यक्ष काम करतात. आणखी ६० लाख लोक यंत्रमाग क्षेत्रात काम करतात. जागतिकीकरणामुळे ही क्षेत्रे हळूहळू मरायच्या पंथाला लागली आहेत. कुटुंबाला एक वेळचं जेवण देण्यासही असमर्थ विणकर उपासमारीचे आणि आत्महत्यांचे बळी ठरत आहेत.[८०]

लाखो कोळी व मच्छीमार उद्योगातील कामगार हे भारतीय मत्स्योद्योगाचा गाभा आहेत. भारताच्या सामुद्रकिनाऱ्यांवर मच्छीमारी करायला परकीय मोठ्या यांत्रिकी मच्छीमार बोटींना सरकारे परवानगी देत आहेत. आता या पारंपरिक मच्छिमारांसमोर उदरनिर्वाहाचे संकट उभे ठाकले आहे.[८१]

देशातील चार लाख लोक असंघटित क्षेत्राच्या रिटेल उद्योगात काम करतात.[८२] सरकार हळूहळू बड्या परकीय कंपन्यांना आणि भारतीय बड्या उद्योगांना ह्या क्षेत्रात येण्यावरील निर्बंध हटवत आहे. परिणामी लाखो छोटे दुकानदार देशोधडीला लागणार आहेत. त्यांना मोठमोठ्या मॉल्स् बरोबर स्पर्धा करणं अशक्य आहे. वॉल मार्ट ही जगातील सर्वात मोठी रिटेल कंपनी आहे, जिचे जागतिक वार्षिक उत्पन्न २८५ अब्ज डालर्स आहे,[८३] भारतातल्या एकूण १.२ कोटी छोट्या दुकानदारांच्या एकूण विक्री पेक्षा जास्त – ह्यांची सगळ्यांची मिळून विक्री फक्त २०५- २५० अब्ज डॉलर्स आहे.[८४]



## (च) शेतीक्षेत्रावरील परिणाम

### साम्राज्यवादी ध्येय्य

देशातील एकूण कष्टकऱ्यांपैकी दोन तृतीयांश पेक्षा जास्त शेती क्षेत्रांत काम करतात. साम्राज्यवाद्यांनी भारतीय शेतीवर आपले नियंत्रण स्थापित करण्याचा डाव रचला आहे, एवढंच नाही तर शेतीउत्पादनाची दिशा बदलून त्यांच्या हितसंबंधांनुसार त्यात हवे ते फेरबदल करत आहेत.

विकसित देश शीत कटीबंधात असल्यामुळे त्यांच्याइथे पिकांचा केवळ एकच नैसर्गिक हंगाम आहे. उष्ण कटीबंधातील पिके तिथे होतच नाहीत. त्यांची शेती ही मुख्यत्वे अन्नधान्य, चरबीयुक्त मांस आणि दुग्धजन्य पदार्थ ह्यांची आहे. ह्याचं भरपूर उत्पादन त्यांच्याकडे होतं. दुसरीकडे, भारतातल्या अत्यंत सुपिक जमिनीत फळे, भाजीपाला, फुले वगैरे सारखी उच्च प्रतीची पिके होतात आणि तीही वर्षभर. आपण युरोप सारख्या थंड हवामानाच्या प्रदेशातील पीक आणि फळंही हिमालयात पिकवतो, आणि उष्ण कटीबंधातील प्रदेशांची पिकेसुद्धा पिकवतो, जी विकसित देशांमध्ये पिकतच नाहीत.

म्हणूनच युरोप आणि अमेरिका आपलं अतिरिक्त धान्य भारताला निर्यात करू इच्छितात. पण हे तेव्हाच शक्य आहे जेव्हा भारत आपलं अन्नधान्याचं उत्पादन कमी करेल. शिवाय हे देश भारतातील फळं आणि भाज्या आयात करू इच्छितात.[८५] अगदी ब्रिटीश काळाप्रमाणे. भारताला स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी ५० वर्षे प्रतिव्यक्ती अन्नधान्य उत्पादन ३०% नी कमी झालं होतं आणि निर्यात होणाऱ्या पिकांच उत्पादन अन्नधान्याच्या उत्पादनापेक्षा १० पट अधिक वेगाने वाढलं होत.[८६]



भारतात छोट्या आणि मध्यम शेतकऱ्यांची संख्या देशातील एकूण शेतकऱ्यांच्या ८०% आहे. त्यांच्या शेतीतील बहुतेक उत्पादन ते स्वत:च्या उपयोगासाठी करतात व बाजारात नेण्यासाठी फारच थोडे शिल्लक राहते. साम्राज्यवाद्यांना त्यांच्या जमिनी ताब्यात घेऊन, तिथे मोठे मोठे फार्मस् उभारून, फळं आणि भाजीपाला निर्यात करायचा आहे. पण ह्यासाठी प्रथम भारतीय शेती उद्ध्वस्त करावी लागेल. म्हणजे मग शेतकऱ्यांना आपली शेती विकणे भाग पडेल.



भारतीय शेतीच्या कायापालटाचा आणखी एक परिणाम म्हणजे भारताची आपली अन्नधान्याची स्वयंपूर्णता नष्ट होईल, आणि आपल्याला अन्नधान्याच्या पुरवठ्यासाठी साम्राज्यवादी देशांवर अवलंबून रहावे लागेल. अन्न ही जीवनाची मूलभूत गरज असल्यामुळे साम्राज्यवाद्यांची आपल्या अर्थव्यवस्थेवरील पकड मजबूत होईल आणि मग ते त्यांच्या इच्छेप्रमाणे कोणत्याही अटी लादायला मोकळे!

### कर्तव्यतत्परतेने अंमल...

भारतीय शासक साम्राज्यवाद्यांची ही विध्वंसक धोरणे कर्तव्यतत्परतेने अंमलात आणत आहेत.

आर्थिक सुधारणापर्व सुरू झाल्यापासून सरकारने शेती, ग्रामीण विकास, सिंचन आणि पूर नियंत्रण, विशेष क्षेत्र कार्यक्रम आणि ग्रामीण व लघु उद्योग ह्या क्षेत्रांमध्ये भांडवली गुंतवणूक तीव्रतेने कमी केली आहे. ह्यातील पहिली तीन क्षेत्रं सरकारची ग्रामीण विकास खर्चाची पारंपरिक क्षेत्रं आहेत आणि शेतीउत्पादकता वाढवण्यासाठी अत्यावश्यक आहेत. शेवटची दोन ग्रामीण रोजगार निर्माण करण्याच्या दृष्टीने महत्वपूर्ण आहेत. अशाप्रकारे ह्या पाचही क्षेत्रांमध्ये होत असलेल्या खर्चाला सरकारचा ग्रामीण विकास खर्च (Rural Development Expenditure किंवा RDE) म्हटलं जाऊ शकतं. भारत सरकारचा, निव्वळ राष्ट्रीय उत्पादन मूल्याच्या तुलनेत मोजला जाणारा, RDE वरील एकूण खर्च १९९० पासून २००१-०२ पर्यंत सरासरी ३.८% वरून १.९% वर घसरला, म्हणजे जवळजवळ निम्म्यावर आला.[८७] हे याच देशात घडतंय जिथे आजही ६०% शेतकऱ्यांना सिंचनाची सुविधा उपलब्ध नाही आणि जिथे एकूण शेतजमिनीच्या ४५% शेतजमिनीची झीज होते.[८८] भारतातील लहान शेतकऱ्यांनी सिंचनासाठी कालवे बांधण्यासाठी, जमिनीची सुपिकता राखण्यासाठी, शेतीउत्पादन वाढवण्यासाठीच्या संशोधनावर व शेतीविकासाच्या अन्य क्षेत्रांवर गुंतवणुकीची अपेक्षा ठेवणेच मूर्खपणाचे आहे.

हे जणूकाही पुरेसं नाही म्हणून की काय, आर्थिक सुधारणा सुरू झाल्यापासून बँकाच्या एकूण कर्जापैकी शेतीक्षेत्राला देत असलेल्या कर्जाचे प्रमाणही हळूहळू कमी होऊन १९९०च्या १३.८% वरून २००३ ला ७.२% वर आले आहे.[८९] त्यामुळे शेतकरी दिवसेंदिवस स्थानिक सावकारांकडून मिळणाऱ्या कर्जावरच जास्त अवलंबून राहू लागले आहेत. हे सावकार जबरदस्त व्याज वसूल करतात.

भारताने आणि तिसऱ्या जगातील इतर देशांनी ज्या WTOच्या 'शेतीविषयक करारा'वर सह्या केल्या आहेत, तो पूर्णपणे पाश्चिमात्य विकसित देशांच्याच फायद्याचा आहे. ह्या विचित्र कराराप्रमाणे तिसऱ्या जगातील देशांना आधीच कमी असलेली आपल्या शेतीवरील अनुदाने अजून कमी करायची आहेत. पण विकसित देश मात्र त्यांच्या देशातील शेतकऱ्यांना दरवर्षी देण्यात येणारी अब्जावधी डॉलर्सची अनुदाने चालूच ठेवू शकतात. विकसित देश आपल्या शेतकऱ्यांना दरवर्षी ५०० अब्ज डॉलर्स एवढे भरभक्कम अनुदान देतात. याउलट, भारताने २००१ मध्ये आपल्या ५५ कोटी शेतकऱ्यांना फक्त १ अब्ज डॉलर्सचे अनुदान दिले. साम्राज्यवादी देश आणि त्यांच्या नियंत्रणाखालील आंतरराष्ट्रीय वित्तसंस्था भारत सरकारचे हात पिरगळून हे नगण्य अनुदानही अजून कमी करायला भाग पाडत आहेत.[१०] म्हणून आर्थिक सुधारणा सुरू झाल्यापासून, केंद्रात आलेल्या सर्व सरकारांनी शेतीवरील अनुदानांमध्ये कपात करायला सुरुवात केली आहे. त्यामुळे खते, सिंचन, वीजपुरवठा, बियाणे, डीझेल, सिंचनासाठी पाणी इ. वरील शेतीचा उत्पादन खर्च सतत वाढतच आहे.

तरीही पाश्चिमात्य रक्तपिपासूंच समाधान झालेलं नाही. अजून एक आर्थिक सुधारणा स्वीकारण्यासाठी त्यांनी भारत सरकारच्या नाड्या आवळल्या आहेत. ती म्हणजे पाश्चात्य देशांच्या भरमसाठ अनुदानं असलेल्या शेतीमालाच्या आयातीला परवानगी देणे. १९९१-९४ ह्या तीन वर्षांच्या तुलनेत २००१-०४ ह्या तीन वर्षांमध्ये कच्च्या रबराची आयात १२६%, कच्च्या कापसाची आयात ५३६% व खाद्य तेलांची आयात २३७९% (घनतेमध्ये) ने वाढली. १९९० च्या दशकाच्या मध्यात आयात केलेले खाद्यतेल एकूण खपाच्या एक छोटा हिस्सा होता तो आता जवळजवळ अर्धा झाला आहे.[११]

ह्याबरोबरच, भारत सरकारने, भारत-अमेरिका शेतीविषयक शिक्षण, अध्यापन, संशोधन, सेवा व व्यापारी संबंधांविषयी माहिती पुढाकार (किंवा AKI) नावाच्या करारावर सही केली आहे. ह्या मंडळामध्ये दोन्ही देशांच्या अधिकाऱ्यांव्यतिरिक्त तीन विशालकाय अमेरिकन MNCs – वॉलमार्ट, मॉनसेंटो आणि आर्चर डॅनिअल्स् मिडलँड कं. - चे प्रतिनिधी सामील आहेत. यातील वॉलमार्ट आधी सांगितल्याप्रमाणे जगातील सर्वात





मोठी रिटेल कंपनी आहे, मॉन्सेंटो ही जगातील सर्वात मोठी जनुकीय अभियांत्रिकी तंत्रज्ञानाने विकसित केलेली बीजे पुरवणारी कंपनी आहे आणि आर्चर डॅनिअल्स् ही कृषि पदार्थांवर प्रक्रिया करणारी जगातील सगळ्यात मोठी कंपनी आहे. हे मंडळ भारतात शेती विषयी संशोधनाच्या प्राथमिकता निश्चित करेल आणि त्या लागू करण्यावर देखरेखही करेल. ह्या करारावर सह्या करण्यापूर्वी ह्याची संसदेत काहीही चर्चा झाली नाही.[१२] ह्या कराराचा मुख्य उद्देश भारतीय शेतीचा भविष्यातील लगाम अमेरिकन शेतकी बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या हातात असेल हे तर स्पष्टच आहे.

## भारतातील अन्नधान्याच्या सुरक्षिततेचा विनाश

ह्याचे परिणाम अगदी स्पष्ट आहेत : भारताच्या शेतीच्या GDP च्या वाढीचा दर कमी झाला आहेः १९८०-९५ ह्या कालावधीतील प्रतिवर्षी ३.३% वरून घसरून १९९६-२००५ मध्ये तो २% वर आला.[१३] महत्त्वाचं म्हणजे अन्नधान्य, भरडधान्य, तेलबिया, डाळी, उस, फळं, आणि भाज्या ह्या सगळ्यांच्या उत्पादनाचा विकासदर वेगाने कमी झाला आहे, आणि काही पिकांचा तर नकारात्मक झाला आहे.[१४] ह्या घसरणीमुळे आपल्या जनतेचे पोषण करण्याच्या देशाच्या क्षमतेवर परिणाम होत आहे. १९९० च्या दशकात अन्नधान्य आणि अन्नधान्याव्यतिरिक्त पिकांच्या उत्पादनाच्या वाढीच्या दरात फार वेगाने घसरण झाली. हरितक्रांतीच्या दिवसांनंतर पहिल्यांदाच ती लोकसंख्येच्या वाढीच्या दरापेक्षा खाली जाऊन पोहोचली - जरी लोकसंख्या वाढीचा दर कमी झाला होता (तक्ता पहा). आणि २००१ ते २००५ च्या दरम्यान तर अन्नधान्याच्या वाढीचा दर शून्यावर येऊन पोहोचला! स्वातंत्र्यपूर्व काळातील शेवटच्या ५० वर्षांत पण अन्नधान्य उत्पादन ०.११% ह्या दराने वाढत होते![१५]

**तक्ता क्र. १**

**भारतातील कृषिक्षेत्रातील उत्पादनाच्या वाढीचा दरात होणारी घसरण[१६]**

| Period | Foodgrains | Non-Foodgrains | All Crops | Population |
|---|---|---|---|---|
| 1980-81 to 1989-90 | 2.85 | 3.77 | 3.19 | 2.1 |
| 1990-91 to 2000-01 | 1.66 | 1.86 | 1.73 | 1.9 |
| 2000-01 to 2005-06 | 0.00 | n.a | n. a | 1.8 |

शेतीविकास दर आणि RDE मधील कपातीमुळे शेतीक्षेत्रातील रोजगारवाढ नष्टच झाली आहे. (ह्याची चर्चा आम्ही पुढे करणार आहोत.)

पण अधिक महत्त्वाचं हे की, कृषिक्षेत्रातील वाढीच्या दराच्या घसरणीमुळे, देशातील प्रतिव्यक्ती अन्नधान्याची वार्षिक उपलब्धता[९७] ५० वर्षापूर्वी होती त्यापेक्षाही कमी झाली आहे. १९५० च्या दशकाच्या सुरुवातीला अन्नधान्याची उपलब्धता १५२ किलो प्रतिव्यक्ती प्रतिवर्षी वरून १९८० च्या दशकाच्या शेवटी १७८ किलो एवढी वाढली होती. त्यानंतर २००१ ते २००४ च्या दरम्यान ती घसरून १५३ किलो वार्षिक सरासरीवर येऊन पोहोचली. अन्नधान्याची उपलब्धता वाढवण्याचे ४० वर्ष केलेले प्रयत्न आर्थिक सुधारणांच्या फक्त १२ वर्षात धुळीत मिळाले. १९९१ च्या तुलनेत आज ५ जणांचे सरासरी भारतीय कुटुंब ११५ किलो कमी अन्नधान्य खाते.[९८]

१९९१ पासून लागोपाठ आलेली सरकारे भारतीय भांडवलदारांच्या नफ्यासाठी आणि धनदांडग्यांच्या उच्च प्रतीच्या जीवनशैलीसाठी देशाला पुन्हा एकदा गुलामीच्या काळातील दुष्काळाकडे ढकलत आहेत.

**साम्राज्यवादी डावपेचांचे यश...**

जागतिकीकरणाचे भाट म्हणतात : काही हरकत नाही, अन्नधान्याच्या उत्पादनातील घट आयातीने भरून काढू! त्याप्रमाणे भारत सरकारने २००६ मध्ये ५५ लाख टन गहू आयात केला.[९९] भारताने गेल्या शंभर वर्षांत पहिल्यांदाच गहू आयात केला. ज्या बहुराष्ट्रीय कंपन्यांचे, विकसित देशांच्या गव्हाच्या निर्यातीवर नियंत्रण होते, त्यांनी ताबडतोब गव्हाचे भाव वाढवले. आणि आपण ९३० रुपये क्विंटल ह्या उच्च भावाने गहू आयात केला! ऑस्ट्रेलियन व्हीट बोर्ड, ग्लेनकोर व कारगिल सारख्या महाकाय कंपन्यांनी ह्यात ५१०० कोटी एवढा प्रचंड नफा कमावला.[१००]

**परिणाम : शेतकऱ्यांच्या आत्महत्या**

शेतकऱ्यांच्या जीवनसाधनांवर होत असलेल्या हल्ल्यामुळे भारतीय शेतकरी उद्ध्वस्त झाला आहे. शेतकरी आणखी आणखी कर्जाच्या सापळ्यात अडकत आहेत. २००५ मध्ये केलेल्या शेतकरी कुटुंबांच्या एका अधिकृत अहवालाप्रमाणे ५०% शेतकरी कुटुंब कर्जाच्या विळख्यात होते. यामधील एक तृतियांश शेतकऱ्यांनी खाजगी सावकाराकडून कर्जे घेतली होती[१०१] जे २४ ते १००% व्याज आकारतात.





ह्या देशातील बहुसंख्य ग्रामीण जनता परत एकदा 'ब्रिटिश राज' मध्ये ढकलली जात आहे.

१५ वर्षे विरोधी धोरणांचे आघात सहन केल्यानंतर काटक भारतीय शेतकरी सुध्दा निराशेच्या गर्तेत पोहोचून आत्महत्या करत आहे. गेल्या १० वर्षांत झालेल्या शेतकऱ्यांच्या आत्महत्येचा आकडा धक्कादायक आहे. १.५ लाखापेक्षा जास्त![१०२]

भारतीय शेतकरी एका बाजूला पूर्णपणे उद्ध्वस्त होत असताना, कॉर्पोरेट घराण्यांना मात्र भारतीय शेतीत घुसण्यासाठी हिरवा कंदील दाखवला जात आहे. जागतिक बँक व केंद्र सरकारच्या दबावाखाली बहुतेक राज्य सरकारांनी कृषी उत्पादन बाजार समिती कायद्यात सुधारणा केली आहे. ह्यामुळे कारगिल, पेप्सीको, ITC, रिलायन्स सारख्या कंपन्या शेतकऱ्यांशी थेट करार करू शकतात, त्यांच्याकडून पिकाची थेट खरेदी करू शकतात.[१०३] ह्याची सुरुवात झाली आहे. ह्या महाकाय शेतकी कंपन्यांनी जागतिक बाजारपेठेसाठी खास फळं, भाज्या, फुलांचे उत्पादन करण्यासाठी हजारो शेतकऱ्यांबरोबर करार केला आहे. १९९१ साली जागतिकीकरणाची प्रक्रिया सुरू झाल्यापासून ८० लाख हेक्टर अन्नधान्याचे उत्पादन करणारी जमीन निर्यातप्रणव पिकांसाठी वापरली गेली आहे.[१०४] नजीकच्या भविष्यात, छोटी शेती उद्ध्वस्त झाल्यानंतर, ह्या बड्या कंपन्या आपल्या मालकीचे अत्याधुनिक फार्मस् उभारणार - जसे त्यांनी इतर गरीब देशांमध्ये उभारले आहेत.

साम्राज्यवाद्यांनी भारतीय शेतीला आपल्या पंजात जखडून ठेवले आहे. ते आपल्या योजनांमध्ये कमालीचे यशस्वी झाले आहेत - भारतीय छोट्या शेतकऱ्यांना गरिबीच्या खाईत ढकलण्याच्या; त्यांना आत्महत्या करायला भाग पाडण्याच्या; त्यांच्या जमिनी बळकावण्याच्या; भारतीय शेतीक्षेत्राला हळूहळू कॉर्पोरेट स्वरुप देण्याच्या. म्हणजे मग जगातील सर्वात सुपीक जमिनी विकसित देशातल्या धनदांडग्यांना पोसण्यासाठी उपलब्ध होतील.

शेवट आम्ही 'दि इकॉलॉजिस्ट' चे संपादक आणि पर्यावरण चळवळीतील विभूती एडवर्ड गोल्डस्मिथ यांचे विचार मांडून करत आहोत. 'टाईम्स ऑफ इन्डिया'ला दिलेल्या मुलाखतीत ते म्हणाले:

"भारतातील दोन-तीन एकरांपेक्षा कमी जमीन असलेले शेतकरी (जागतिकीकरणात) कसे काय टिकू शकतील?... ते नाही टिकू शकणार. ते सर्व शहरांमधल्या झोपडपट्टयांकडे ढकलले जातील. झाडून सारे. आणि जेव्हा तुमचा छोटा शेतकरी वर्ग असा आयुष्यातून उठेल, तेव्हा तुमचे छोटे दुकानदार, विक्रेते, बलुतेदारही उरणार नाहीत. ते सर्व जण उखडले जातील कारण त्यांचे अस्तित्वच मुळी शेतकऱ्यांवर अवलंबून आहे. अशा रीतीने तुम्ही ६० ते ७० कोटी लोकांना देशोधडीला लावाल आणि त्यांना कंगाल बनवाल.

"सत्तर कोटी लोकांना देशोधडीला लावण्याचे काय परिणाम होतील तुम्हाला कल्पना आहे? जगात आजवरच्या इतिहासात हे कोणीही केलेलं नाही! तुमच्या देशाच्या जागतिकीकरणाचे हेच अपरिहार्य परिणाम आहेत. ते भारताला उद्ध्वस्त करेल."[105]

## (छ) वित्तीय क्षेत्रातील सुधारणा

वित्तीय क्षेत्र हे अर्थव्यवस्थेचे मज्जातंतू आहेत. सार्वजनिक क्षेत्रातील बँका व विमा कंपन्यानी देशाच्या विकास योजनांमध्ये अत्यंत महत्त्वाची भूमिका बजावली आहे. या क्षेत्रांनी सामान्य जनतेला अल्पबचतीसाठी प्रेरित करून, सरकारला वापरण्यासाठी अब्जावधी रुपये उभे केले. यातूनच सरकारने शेतीक्षेत्र, लघुउद्योग, घरबांधणी, ग्रामीण विद्युतीकरण, मागास भागांचा विकास आणि तत्सम राष्ट्रीय महत्त्वाच्या क्षेत्रांमध्ये गुंतवणूक केली. ३१ मार्च २००७ ला सार्वजनिक क्षेत्रातील बँकांच्या ठेवी १९ लाख कोटी रुपयांवर गेल्या होत्या;[१०६] तर आयुर्विमा महामंडळाचा (Life Insurance Corporation of India किंवा LIC) 'लाइफ फंड' २००७-०८ मध्ये ६ लाख ८६ हजार कोटी रुपयांवर जाऊन पोहोचला होता, एकूण खाजगी मालमत्ता व धनसंपदा ८ लाख ३ हजार कोटी होती, आणि ३१ मार्च २००८ ला त्यांची पायाभूत व सामाजिक क्षेत्रामधील गुंतवणूक ८२ हजार २२ कोटी रुपये होती.[१०७]

म्हणूनच साम्राज्यवाद्यांना ह्या संस्थांवर ताबा मिळवायचा आहे. मग अर्थातच ह्या संस्थांमध्ये असलेल्या अवाढव्य पैशावरही ताबा मिळेल, आणि त्याचा ते हवा तसा वापर करू शकतील. म्हणून ते ह्या वित्तीय संस्थांच्या खाजगीकरणाची मागणी करत आहेत. सरकार त्यांची इच्छापूर्ती करायला तत्पर आहे. केवळ बँका आणि विमा क्षेत्रातील कर्मचाऱ्यांच्या विरोधामुळे या क्षेत्रातील पुनर्रचनेचा वेग मंदावला आहे.



भारताच्या एकूण विकासावर ह्याचा विपरीत परिणाम तर होणारच आहे, पण भारतीय जनतेवरही त्याचा विनाशकारी परिणाम होईल.

**परकीय विमा कंपन्या : चोर, बदमाश...**

भारतातील सार्वजनिक क्षेत्रातील आयुर्विमा महामंडळ (LIC) आणि सर्वसाधारण विमा महामंडळ (General Insurance Corporation of India किंवा GIC) ह्या जगातील सर्वात उत्तम विमा कंपन्यांमध्ये गणल्या जातात. विमा कंपन्यांच्या कामगिरीचे मूल्यमापन करण्यासाठी सर्वात महत्वाचा निकष असतो दाव्यांची पूर्तता (Claim Settlement). दाव्यांची पूर्तता करण्याचे आंतरराष्ट्रीय प्रमाण (सरासरी) ४०% एवढे कमी आहे,[१०८] तर LIC चे हे प्रमाण ९९% एवढे अविश्वासनीय आहे.[१०९] हा एक जागतिक विक्रमच आहे. आता ह्या कंपन्यांचं जर खाजगीकरण झालं, तर कदाचित ह्या कंपन्या प्रामाणिक दावे सुध्दा देणार नाहीत - आंतरराष्ट्रीय दाव्यांची पूर्तता करण्याचं प्रमाण म्हणूनच इतकं कमी आहे. सर्वात वाईट गोष्ट म्हणजे ते दिवाळखोरी घोषित करून गायब पण होऊ शकतात.

आम्ही अतिशयोक्ती करत नाही. सट्टेबाजीतील गुंतवणुकीमुळे आणि अनैतिक व्यवहारांमुळे विकसित देशांतील शेकडो विमाकंपन्या दरवर्षी दिवाळखोरी जाहीर करतात. अमेरिकेत तर विमा कंपन्या बंद पडण्याचे प्रमाण एवढ्या लाजिरवाण्या पातळीवर पोहोचले आहे की त्यांची चौकशी करण्यासाठी संसदीय उपसमिती नेमण्यात आली. १९९० मध्ये त्यांनी सादर केलेल्या अहवालात अमेरिकन विमा कंपन्यांच्या 'लज्जास्पद व्यवस्थापन' ह्यावर बोट ठेवले आणि म्हटले: "ह्या उद्योगातील लबाड आणि बदमाश स्वत: गब्बर होण्यासाठी नियम धाब्यावर बसवून नवनवीन योजना राबवतात आणि त्यातून निर्धोकपणे, सहीसलामत सुटतात".[११०] आजही परिस्थिती बदललेली नाही. AIG ह्या १००० अब्ज डॉलर्सच्या जगातील सर्वात मोठ्या विमा कंपनीला काही महिन्यांपूर्वीच दिवाळखोरीतून वाचवण्यासाठी अमेरिकी शासनाने ८५ अब्ज डॉलर्स दिले.



भारतात सुध्दा पूर्वी विमा कंपन्या भारतातील बड्या उद्योगसमूहांच्या ताब्यात होत्या. हे उद्योगसमूह विमाधारकांकडून जमा केलेला निधी आडमार्गाने नेहमीच इतर उद्योगांकडे वळवत असत. फसवणूक करत असत. म्हणूनच

सरतेशेवटी, शासनाला या कंपन्या ताब्यात घेऊन त्यांचे राष्ट्रीयीकरण करावे लागले.[111] आता पुन्हा एकदा विमा खाजगी क्षेत्रात असण्याच्या अवस्थेकडे आपण जात आहोत. परत फसवणूक सुरू झाली आहे. लाइफलाईन ग्लोबल ह्या वैद्यकीय विमा उतरविणाऱ्या कंपनीने अचानक २००६ मध्ये आपलं दुकान बंद केल - फक्त पुण्यात त्यांचे हजारो ग्राहक होते.[112]

**खाजगी बँका : ठेवींची खात्री नाही.**

तसेच एकदा सार्वजनिक क्षेत्रातील बँकांचं खाजगीकरण झालं, की मग त्यांचे खाजगी मालक वित्तीय अफरातफरी किंवा सरळ फसवणूक करून दिवाळखोरी जाहीर करणारच नाहीत, ह्याबद्दल कसलीही खात्री देता येत नाही. १९९७ च्या पूर्व आशियातील वित्तीय संकटामध्ये अनेक खाजगी वित्तीय संस्था दिवाळखोरीत निघाल्या. गेल्या काही महिन्यांमध्ये विकसित देशांमधील काही सर्वात मोठ्या खाजगी बँका बुडाल्या - लोकांच्या बचतीच्या पैशावर त्या जुगार खेळत होत्या.[113] भारतातही गेल्या काही वर्षांमध्ये खाजगी सहकारी बँका, त्यांच्या संचालकांनी केलेल्या फसवणुकीमुळे दिवाळखोरीत गेल्या. परिणामी, लाखो सामान्य माणसांच्या कष्टाने कमावलेल्या पैशांवर पाणी टाकले गेले. तरीही, सार्वजनिक क्षेत्रातील बँकांवर सरकारी नियंत्रण असल्यामुळे त्या बंद पडल्या नाहीत. एकदा ह्या बँका खाजगी झाल्या की मग ही खात्री देता येणार नाही. कल्पना करा की अचानक एक दिवस बँक ऑफ महाराष्ट्रने दिवाळखोरी घोषित करून बँकेला टाळं लावलं, तर काय होईल?

गोऱ्या कातडीच्या वारसांचा, कामगारांच्या बचतीवरही डोळा आहे. सरकारी आणि संघटित क्षेत्रातील ४.५ कोटी कर्मचाऱ्यांच्या वेतनातून कापल्या जाणाऱ्या भविष्यनिर्वाह निधीचे व्यवस्थापन आत्तापर्यंत सरकारच्या वतीने स्टेट बँक ऑफ इंडिया पहात होती. ही रक्कम प्रचंड म्हणजे २.४ लाख कोटी रुपये झाली आहे. आता सरकारने SBI ची मक्तेदारी संपवून ह्याच्या खाजगीकरणाचे पहिले पाऊल उचलले आहे. ३० जुलै २००८ ला सरकारने HSBC, ICICI Prudential आणि Reliance Capital ला ह्या निधीचे व्यवस्थापन करायला परवानगी दिली.[114] यानंतर दोन आठवड्यातच सरकारने घोषणा केली की १ एप्रिल २००९ पासून ते ह्या निधीच्या १५%





रकमेची गुंतवणूक शेअरबाजारात करू शकतात.[115] पण मग शेअरबाजार कोसळला की काय? गेल्या काही वर्षांत, शेअरबाजार कोसळल्यामुळे जगभरातल्या कामगारांच्या निवृत्तीवेतन निधीचे कोट्यवधी डॉलर्स गायब झाले (अर्थातच, जिथे ह्याचं खाजगीकरण झालं होत तिथे). अमेरिकेमध्ये २.७ कोटी कामगारांना निवृत्ती वेतन निधीतून मदत मिळते. २००८ मध्ये ह्या निधीचे मूल्य एक पंचमांशने कमी झाले.[116] कॅलिफोर्निया पब्लिक एम्प्लॉइज रिटायरमेंट सिस्टीम हा अमेरिकेतील सर्वात मोठा निर्वाह निधी आहे. २००७ मध्ये ह्या निधीची मालमत्ता सगळ्यात जास्त म्हणजे २६० अब्ज डॉलर्स होती ती २००८ मध्ये १८६ अब्ज डॉलर्सवर आली. ह्याच्या स्थापनेपासून त्याच्यात पहिल्यांदाच एवढी प्रचंड घट झाली. लाखो अमेरिकन राज्य कर्मचाऱ्यांना जबरदस्त नुकसान सोसावे लागणार आहे कारण त्यांच्या निवृत्ती वेतनामध्ये मोठ्या प्रमाणात कपात होणार आहे.[117]

## (ज) जागतिक कचरापेटी

डॉलर्सच्या हव्यासापोटी देशाच्या शासकांनी भारताला साम्राज्यवाद्यांची कचरापेटी बनवून टाकली आहे.

दिल्ली ही इलेक्ट्रॉनिक कचऱ्यावर पुन:प्रक्रिया करणारी जगभराची जणू राजधानीच बनली आहे. हा अत्यंत धोक्याचा उद्योग आहे. ह्यामुळे जमीन व भूगर्भजल प्रदूषित होतं, आणि कामगारांच्या आरोग्याचा प्रश्नही निर्माण होतो. विकसित देशांमध्ये पुन:प्रक्रिया उद्योग अत्यंत नियंत्रित आणि भयंकर खर्चिक आहे. विदेशी 'लॉर्डस्'चा खर्च कमी करण्यासाठी, त्यांचे पर्यावरण आणि आरोग्याचे रक्षण करण्यासाठी भारत सरकार विकसित देशांमध्ये निर्माण झालेल्या इ-कचऱ्याच्या ७०% कचरा दिल्लीत पुन:प्रक्रियेसाठी येऊ देत आहे. ह्या उद्योगाला अधिकच प्रोत्साहन देण्यासाठी जाणीवपूर्वक सरकारने ह्याला कुठल्याही नियमांच्या बंधनात अडकवलेले नाही.[118]



जागतिक पातळीवर जहाजांच्या विषारी कचऱ्याची सुद्धा भारत कचरापेटी आहे. जगभरातून हजारो टन प्राणघातक रसायने असलेली विषारी जहाजं तोडण्यासाठी, त्यांना गुजराथ मधील अलंग येथे आणलं जातं. अलंग जहाजं तोडण्याचं जागतिक केंद्र आहे. तिथे कामगार भारतातल्या सगळ्यात मागासलेल्या राज्यांमधून येतात. दरवर्षी सुमारे ६० कामगार अपघाताने मरतात, आणखी

शेकडो जखमी होतात, दर ६ पैकी १ कामगार ॲसबेसटॉसिस ह्या जीवघेण्या रोगाचा बळी ठरतो. पण, एक मोठे जहाज तोडणे म्हणजे १ कोटी डॉलर्सचा धंदा. आपल्या माणसांची किंमत एवढी नक्कीच नाही. म्हणूनच सर्वोच्च न्यायालयानेही हस्तक्षेप करायला नकार दिला आहे. "पर्यावरणावर विपरीत परिणाम झाल्याशिवाय विकास होत नाही", गेल्या वर्षी कोर्टाने असे विधान केले.[११९]

हे थोडं म्हणून की काय, आपला देश विकसित देशांच्या घरगुती कचऱ्याची सुद्धा कचरापेटी बनला आहे. विकसित देशांत घरगुती कचऱ्यावरपण पुन:प्रक्रिया फार गुंतागुंतीची आणि खर्चिक आहे - १२००० रुपये प्रति टन खर्च येतो. कचरा भारतात पाठवून देणं त्यापेक्षा कितीतरी कमी त्रासाचं, आणि स्वस्त आहे - फक्त २८०० रुपये प्रति टन. म्हणून युरोप आणि अमेरिका आपल्या घरातील कचरा भारतात पाठवतात.[१२०] मेरा भारत - कचरा महाशक्ती!

**आणखी हजार भोपाळ**



परकीय गुंतवणूकदारांनी त्यांच्या अब्जावधी डॉलर्सची भारतात गुंतवणूक करावी ह्यासाठी सरकार त्यांना आपल्या पर्यावरणाचा विनाश करण्याची खूली सूट देत आहे. परकीय MNCs आणि त्यांचे भारतीय भागीदार, भारतीय खाजगी बडे उद्योगपती, ह्यांना जंगलेच्या जंगले तोडून टाकण्याची, मासेमारीच्या नावावर संपूर्ण समुद्रकिनारे उद्ध्वस्त करण्याची, जमिनीखालील पाणी प्रमाणाबाहेर उपसण्याची, आपली हवा, भूगर्भजल, जमिनी, नद्या, समुद्र प्रदूषित करण्याची, सरसकट कुठेही खाणउद्योग सुरू करण्याची आणि जिवंत असलेल्या आणि जन्माला येणाऱ्यांचं सुद्धा आरोग्य बिघडवून टाकण्याची खूली सूट देत आहेत. काही उदाहरणे :

- युरोपियन युनियन आणि अमेरिकेतल्या अनेक देशांनी ॲसबेसटॉसच्या सर्व प्रकारांवर बंदी घातली आहे, कारण त्यामुळे ॲसबेसटॉसिस हा जीवघेणा आजार आणि फुफ्फुसांचा कर्करोग होतो. पण तरीही, २००० कोटी रुपयांच्या ॲसबेसटॉस सिमेंट उद्योगाच्या दबावाखाली भारत सरकार त्यावर बंदी घालायला तयार नाही. भारतात सगळीकडे त्याचा वापर सुरूच आहे. भारत



दरवर्षी २३० कोटी रुपये किंमतीचे ॲसबेसटॉस आयात करते आणि १२,५०० कोटी टन ॲसबेसटॉस दरवर्षी उपयोगात आणते.[१२१]

- मोठमोठे उद्योग आपले कारखाने व खाणी बांधताना आणि चालू करताना, पर्यावरणाच्या कायद्यांचं सरळसरळ उल्लंघन करत आहेत. 'वेदान्त अल्यूमिनियम' (ओरिसा), 'स्टरलाइट' (तुतिकोरीन तामिळनाडू), 'जिंदाल स्टील' (छत्तीसगढ), अशा अनेक मोठ्या उद्योगांनी प्रथम कारखाने उभे केले, उत्पादन सुरू केले आणि त्यानंतर त्यांना पूर्वीच्या तारखेची परवानगी मिळाली आहे.[१२२] तामिळनाडूतील मेत्तूर येथील 'केमप्लास्ट' पी.व्ही.सी. फॅक्टरी आपलं डायोक्सीन मिश्रित विषारी सांडपाणी कावेरी नदीत सोडते, ज्यामुळे अनेक गावातील लोकांना दूषित पाणी प्यावं लागत आहे.[१२३] तामिळनाडूतीलच कड्डुलुर येथील 'सिपकॉट' ह्या रासायनिक औद्योगिक क्षेत्राच्या परिसरात राहणारे हजारो लोक जणू काही गॅस चेंबर मध्येच रहात आहेत.[१२४] ओरिसामधील पारादीप येथील 'ओसवाल केमिकल्स'च्या प्रदुषणामुळे कारखान्याच्या परिसरातील १ लाख लोकांच्या जीवनावर विध्वंसक परिणाम झाला आहे.[१२५]
- जगातील काही सर्वात 'महाभयंकर विषारी पट्टे' भारतात आहेत. केरळमधील एल्लूर औद्योगिक वसाहत ह्यापैकीच एक.[१२६] ओरिसातील सुखिंदा दरीमध्ये एक चतूर्थांश लोक प्रदूषणामुळे होणाऱ्या आजारांनी पीडित आहेत, तर गुजराथमधील वापी ते अहमदाबाद हा रासायनिक औद्योगिक पट्टा हे एक विषारी दु:स्वप्नच आहे: पाण्यातील पाऱ्याचं प्रमाण सुरक्षिततेच्या पातळीच्या ९६ पट जास्त आहे.[१२७]
- कोकाकोला आणि पेप्सीकोलाचे ९० कारखाने (बॉट्लिंग प्लॉंटस्) भारतात आहेत. ह्या बहुराष्ट्रीय कंपन्या रोज जमिनीखालील लाखो लिटर पाणी उपसतात. परिणामी तेथील लोकांना पिण्याच्या पाण्याच दुर्भिक्ष निर्माण झालं आहे. ह्या कंपन्या आपला टाकाऊ विषारी कचरा आसपासच्या शेतांमध्ये टाकतात. त्यामुळे शेती तर उद्ध्वस्त झालीच आहे, शिवाय लोकांना अनेक आजारांनाही सामोर जावं लागत आहे.[१२८]
- स्वैरपणे होणाऱ्या औद्योगिकरणामुळे जंगलतोडीचं प्रमाण तर भयंकर वाढलं आहे. २००१ ते २००३ ह्या काळांत २६,००० स्के.कि.मी. जंगल कापलं गेलं आहे.[१२९] १९९० च्या दशकाच्या शेवटी भारताच्या केंद्रीय प्रदूषण नियंत्रण

मंडळाने देशातील २२ औद्योगिक क्षेत्रांचे सर्वेक्षण केले. ह्या सर्व क्षेत्रांच्या परिसरातील जमिनीखालील पाणी रोगजंतुनी आणि धातुंनी प्रदूषित झाल्यामुळे पिण्याच्या लायकीचं राहिलेलं नाही असा निष्कर्ष काढला![१३०]

पर्यावरणाचे संकट प्रचंड असले, तरीसुद्धा WB आणि MNCs च्या हुकुमावरून भारत सरकारने अलीकडे 'राष्ट्रीय पर्यावरण धोरण' जाहीर केले. ह्यामध्ये परकीय गुंतवणूकदारांना प्रोत्साहित करण्यासाठी पर्यावरणाचे नियम, कायदे अजूनच शिथिल केले आहेत.[१३१] डॉलर, ओ डॉलर, ओ डॉलर डॉलर...

## (झ) आण्विक ऊर्जेच्या राक्षसाचा विळखा

भारत सरकारने अणुऊर्जा निर्मितीत लक्षणीय वाढ करण्याचा निर्णय घेतला आहे, आणि त्यासाठी परकीय आण्विक कंपन्यांना आमंत्रित केलं जात आहे. ज्या अमेरिकन कंपन्यांना भारतात गुंतवणूक करायची आहे त्यांच्यासाठी आण्विक ऊर्जेचे दरवाजे उघडणे म्हणजे दुधात साखरंच. आण्विक वीज प्रकल्पांमुळे 'वेस्टींगहाऊस' आणि 'जनरल इलेक्ट्रिक' सारख्या बड्या उद्योगधद्यांना १०० अब्ज डॉलर्सचे कंत्राट मिळेल अशी अपेक्षा आहे. अमेरिकेतील थ्री माइलस् आयलंड येथे १९७९ साली आणि युक्रेनमधील चेर्नोबिल येथे १९८६ साली झालेल्या अपघातांनंतर ह्या कंपन्यांना अणुभट्टी उभे करण्याची ऑर्डर अपवादात्मकच मिळाली आहे. अमेरिकेमध्ये १९७८ नंतर आत्तापर्यंत एकही नवीन प्रकल्पाची ऑर्डर दिली गेली नाहिये.[१३२] त्याचप्रमाणे प.युरोपमध्ये सुद्धा गेल्या दोन दशकांत फक्त दोन अणुउर्जा प्रकल्प उभे राहत आहेत - फ्रान्स आणि फिनलँड मध्ये.[१३३] ह्या दोन्ही प्रकल्पांबाबत तिथल्या सुरक्षा अधिकाऱ्यांनी प्रश्न उभे केले आहेत.[१३४] आण्विक ऊर्जा नुसतीच प्रचंड महाग नाही तर ती भयंकर मारक आहे. ह्याच कारणामुळे युरोप, अमेरिकेमध्ये आण्विक उर्जा प्रकल्प बंद होत आहेत.

युरेनियम पासून अणुऊर्जा बनवण्याच्या प्रदीर्घ प्रक्रियेमध्ये प्रत्येक पायरीवर - ज्याला आण्विक इंधनचक्र म्हणतात - किरणोत्सर्ग वातावरणात पसरतात. मानवी अस्तित्वासाठी हे अत्यंत धोकादायक आहे[१३५]:



- युरेनियमच्या खाणींमध्ये काम करणाऱ्या आणि त्याच्या आसपास राहणाऱ्या लोकांना किरणोत्सर्गी धूळ आणि विषारी रसायने



ह्यामुळे कर्करोग, व्यंग घेऊन जन्माला येणारी मुले, वांझपणा ह्याला सामोरं जायला लागत आहे.

- अणुभट्टीमधून अनेक प्रकारांनी किरणोत्सर्ग वातावरणात सोडले जातात. किरणोत्सर्ग मानवाच्या शरीरातील जनुकांमध्ये बदल घडवतो, ज्यामुळे लहान वयातच मोठ्या वयाचे आजार, कर्करोग होतात आणि पुढच्या पिढ्या व्यंग घेऊन जन्माला येतात.
- अणुभट्टीच्या घातक किरणोत्सर्गी कचऱ्याची विल्हेवाट हा आणखी एक गंभीर प्रश्न आहे. ह्याला लाखो वर्षे सुरक्षितपणे साठवून ठेवावा लागतो. इतक्या वर्षात तो गळणार नाही ह्याची काय हमी आहे? फ्रान्समधील अणुकचरा साठवण्यासाठी बनवलेल्या कायमस्वरुपी जागांमधून आत्ताच गळती होऊ लागली आहे! ह्या भागातील भूगर्भजल जगाच्या अंतापर्यंत प्रदूषित झाले आहे.[१३६]

अणुभट्ट्यांमध्ये कधीही भीषण अपघात होऊ शकतो. एप्रिल १९८६ मध्ये युक्रेन मधील चेर्नोबिलच्या अणुभट्टीत मोठा अपघात झाला. त्यात हजारो माणसे मारली गेली, आणि महाराष्ट्राएवढा भूखंड पुढील २०,००० वर्षांसाठी प्रदूषित झाला आहे.[१३७] अणुवीज निर्मितीतील गुंतागुंती पाहता अणुभट्टीत अपघात होण्याची शक्यता खूप जास्त असते.[१३८] गेल्या अनेक वर्षांमध्ये झालेले अनेक छोटे अपघात पाहता एखादा चेर्नोबिल नाही घडला हे नशीबच म्हणायचं.[१३९]

आण्विक वीज ही कागदावरसुद्धा कोळसा किंवा गॅसच्या वीजनिर्मितीपेक्षा दिडपट महाग आहे. प्रत्यक्षात तर त्यापेक्षा कितीतरी प्रमाणात जास्त आहे, कारण जगभरातील सर्व सरकारे अणुऊर्जेला प्रचंड अनुदानं देतात. अगदी अब्जावधी डॉलर्स.[१४०]

हे सर्व माहीत असूनही भारतातील बुद्धिवाद्यांनी आण्विक ऊर्जा कशी सुरक्षित आहे, पर्यावरणपूरक आहे, स्वस्त आहे, ह्याची सामान्यांना खात्री पटावी, म्हणून जोरदार गाजावाजा सुरू केला आहे. भारत सरकार आपल्या देशांत ठिकठिकाणी अणुवीज प्रकल्प उभे करत आहे. महाराष्टात, रत्नागिरीत जैतापूर येथे जगातील मोठा अणुऊर्जा प्रकल्प उभा केला जात आहे. एखादा गंभीर अपघात चुकुन झालाच, तर पुण्यासह संपूर्ण पश्चिम महाराष्ट्र पुढच्या हजारो वर्षांसाठी माणसांना राहण्याच्या लायकीचा असणार नाही.

भारतीय राज्यकर्त्यांनी दिडदमडीसाठी आपला आत्मा विकला आहे.

## (ट) अमेरिकेचे ‘बुलडॉग’

भारतीय काळे शासक आता देशाचे स्वतंत्र संरक्षण धोरणही निकालात काढायला निघाले आहेत! आशिया खंडासाठी भारताने अमेरिकेचा पहारेकरी बनावं, ह्यासाठी त्याची पुनर्रचना करण्यात येत आहे - मध्यपूर्वेत अमेरिकेसाठी इस्त्रायल जी भूमिका वठवत आहे त्यासारखी. आणि म्हणूनच हे दोन्ही पहारेकरी एकमेकांच्या जास्त जवळ आले आहेत.

अमेरिकेच्या संरक्षण खात्याने हे स्पष्टपणे मान्य केले आहे की ते भारताकडे त्यांचा भावी सैनिकी भागीदार म्हणून बघतात, “जो आशिया खंडात शांतता राखणे व पहारा देण्यासारखी गौण कृत्यांची जबाबदारी घेईल... ज्यामुळे अमेरिकेला वरच्या दर्जाच्या लढाया करण्यावर लक्ष केंद्रित करता येऊ शकेल.” असे “भारत अमेरिका लष्करी नातेसंबंध : अपेक्षा आणि दृष्टीकोन” ह्या ऑक्टोंबर २००२ मध्ये पेन्टागनने जाहीर केलेल्या अहवालात म्हटले आहे. या अहवालात पुढे असंही म्हटलं आहे, की अमेरिका भविष्यात भारतीय सैनिकी तळ व संरक्षण खात्याच्या अन्य पायाभूत गोष्टींचा वापर करू इच्छिते.[१४१] भारतीय दलाल शेपट्या हलवत तो ताबडतोब लागू करण्यासाठी पावले उचलत आहेत. २८ जून २००५ ला भारत आणि अमेरिकेने “संरक्षण नातेसंबंधित नवीन रचने”वर सह्या केल्या, ह्यात ती लागू करण्याचा कृती कार्यक्रमही दिला आहे.[१४२]

ह्या विश्वासघाताचे बक्षीस म्हणून अमेरिकेने भारतीय शासकांबरोबर आण्विक सहकार्याचा करार केला. ह्यात भारतीय शासकांना आपल्या गद्दारीवर पांघरुण घालण्याची संधी मिळाली. ते आता हे सांगत फिरत आहेत, की भारताला महासत्ता बनवण्यामध्ये अमेरिका मदत करत आहे. आणि, जो भारत-अमेरिकेच्या सैनिकी व आण्विक संबंधांना विरोध करेल, तो देशाबरोबर गद्दारी करत आहे. ‘भारत-अमेरिका संरक्षण संबंधित नवीन रचने’वर सह्या झाल्यानंतर दोन आठवड्यातच अध्यक्ष बुश आणि पंतप्रधान मनमोहन सिंग ह्यांनी जाहीर केलं की ते ‘आण्विक सहकार्या’चा करार करणार आहेत.[१४३]



पंतप्रधानांनी संसदेत भारत-अमेरिका आण्विक कराराचं समर्थन करताना लाळघोटेपणाचे सर्व विक्रम तोडले आहेत. अमेरिकेच्या संसद सभासदांनी विचारलेल्या प्रश्नांना बुश सरकारने दिलेली उत्तरे बासनात गुंडाळून ठेवली होती, ती जनतेसमोर सप्टेंबर २००८ मध्ये पुढे आली. ह्यामधून असंच सिद्ध होतंय की पंतप्रधान मनमोहन सिंग भारतीय संसदेमध्ये खोटं सांगत होते! उदा. मनमोहनसिंग असा दावा करत होते की ह्या करारामुळे भारताला उच्च प्रतिचे आण्विक तंत्रज्ञान मिळेल, जे देशाच्या औद्योगिकरणाला जोमाने पुढे घेऊन जाईल, पण बुशनी लिहिलेल्या पत्रांत मात्र हे या करारात नाही असं स्पष्ट लिहिलं आहे. तसंच, भारताने भविष्यात आण्विक चाचणी करता कामा नये ही अटही ह्या करारात आहे हे पण बुशच्या पत्रात स्पष्ट लिहीलं आहे. पुढे, अमेरिकेने जर हा करार संपुष्टात आणला, तर भारताला आण्विक सामान कोणी पुरवू नये असा दबाव ते इतर देशांवरही घालतील. ह्या दोन मुद्यांवर सुध्दा पंतप्रधान संसदेत सातत्यानी धडधडीत खोटं बोलत होते.[१४४]

भारताने आण्विक चाचणी करू नये हेच मत आमचंही आहे. पण हा निर्णय देशाने आपल्या सार्वभौमिकतेने घ्यायला हवा. तो कुठल्याही दबावाखाली घेता कामा नये. अमेरिकेला ह्या मुद्यावर दादागिरी करण्याचा कुठलाही अधिकार नाही. पण ह्या मुद्दयावरही अमेरिका भारतीय शासकांची दमदाटी करत आहे.

अमेरिकेचे साम्राज्य आशिया खंडात पसरविण्यामध्ये भारताला प्यादे बनवण्याची सुरुवात झाली आहे. अमेरिकेच्या युध्दनौका भारतीय बंदरांवर भेटी देऊ लागल्या आहेत. संयुक्त समुद्री आणि हवाई संचलन वरचेवर होऊ लागले आहे. भारतीय संरक्षण संस्थांचे दरवाजे अमेरिकेच्या सैनिकी तुकड्यांना तपासणीसाठी उघडले जात आहेत...

दिल्लीचे शासक व्हाईट हाऊसच्या धर्मगुरुंपुढे आणि डॉलरदेवापुढे लोटांगण घालत आहेत ह्यात काही शंका नाही.

### भाग पाच

# क्षणभंगुर भरभराटीचा स्फोट

भांडवल संचय व्यवस्थित चालू रहावा म्हणून देश इतकी किंमत चुकवत असूनसुध्दा गेले काही महिने भारतीय अर्थव्यवस्थेची घसरण सुरू झाली आहे हे स्पष्टच आहे. अगदी गेल्या काही महिन्यांपूर्वीपर्यंत भारत एक ‘आर्थिक महासत्ता’

बनतं आहे असं चित्र उभं केलं जात होतं. वाढीचा दरही लवकरच 'दोन आकड्यांवर जाऊन पोहोचेल' अशी अपेक्षा केली जात होती. मीडिया आणि सरकार अशा पद्धतीने गाजावाजा करत होते की जणू काही ही वाढ कायमस्वरुपीच राहील. आता ही अत्यानंदाची अवस्था धूसर झाली आहे.

सगळे अधिकारी आणि टीकाकार भारताच्या विकासगाथेच्या स्फोटाचा दोष बाहेरच्या गोष्टींना देत आहेत. आपल्या मूलतत्वांमध्ये काहीच चूक नाहिये, जागतिक मंदीमुळे असं झालं आहे असा त्यांचा खुलासा आहे. भाग ४ उपभाग (ii) मध्ये चर्चा केल्याप्रमाणे, २००२ नंतर झालेली भरभराट ही विपर्यास होती, ती संकुचित पायावर आधारीत होती. ती अगाध गरिबीत जीवन जगणाऱ्या बहुसंख्य लोकांच्या क्रयशक्तीमध्ये वाढ झाल्यामुळे आलेली भरभराट नव्हती. उलट, धनदांडग्यांच्या ऐयाषीच्या वस्तूंची खरेदी आणि गृहप्रकल्पातील गुंतवणुकीमुळे आली होती. बँकांनी मुक्तपणे दिलेल्या कर्जांमुळे ह्याला खतपाणीच मिळालं; शेअरबाजाराच्या भरभराटीनेही मदत केली. निर्यातीतील वाढीसारख्या काही बाहेरच्या गोष्टींचाही परिणाम झाला, पण ह्यातून हेच सिद्ध होतं की भरभराट संकुचित पायावर आधारित होती.



म्हणून, गेल्या ५ वर्षातील औद्योगिक भरभराट आणि GDP च्या उंच वाढीचा दर हा भारताच्या अर्थव्यवस्थेच्या बळकट मूलतत्वांमुळे नव्हता हे स्पष्ट आहे. उलट, ही वाढ कृत्रिमरित्या फुगवण्यात आली होती. मागणी लोकसंख्येच्या ५-६% लोकसंख्येपर्यंत मर्यादित होती. अर्थातच, अशा प्रकारची भरभराट फार काळपर्यंत रहात नाही. शेवटी, श्रीमंत आपल्या श्रीमंतीच प्रदर्शन किती काळ करणार! आत्ता नाही तर नंतर, ह्या भरभराटीचा फुगा फुटणारच होता, आणि मग औद्योगिक भरभराटीची घसरण सुरू होणारच होती. ह्या वर्षीच्या (२००८) सुरुवातीपासून अगदी हेच घडत आहे - म्हणजे विकसित देशांच्या अर्थव्यवस्थांना मंदीने घेरायला सुरुवात केली त्याआधीपासून. औद्योगिक उत्पादनाचा निर्देशांक मार्च २००८ पासून घसरत आहे ह्यावरूनही हे कळून येतं. तसंच, ग्राहकोपयोगी वस्तूंचे उत्पादनही जानेवारी २००८ मध्ये उंचीवर पोहोचलं आणि त्यानंतर सतत घसरत आहे.[१४५]



ह्या घसरणीला बाहेरची परिस्थिती कारणीभूत नसली, तरी त्यांनी ती तीव्र करायला मदत केली: विकसित देशांमधील आर्थिक घसरणीमुळे निर्यातही कोसळली.

घसरणीला तीव्र करणारी – फक्त तीव्र करणारी, निर्माण करणारी नव्हे – आणखी एक गोष्ट म्हणजे शेअरबाजाराची घसरण. २००७ ह्या एका वर्षात भारतातील निव्वळ FII ची आवक अंदाजे २० अब्ज डॉलर्स होती. परिणामी शेअरबाजार अति उंचावत गेला. त्यानंतर, २००८ सालच्या सुरुवातीच्या साडेनऊ महिन्यांमध्ये परकीय संस्थात्मक गुंतवणुकीने ११.१ अब्ज डॉलर्स बाहेर नेले. शेअरबाजार कोसळला, जितक्या झटपट त्याची भरभराट झाली होती तितक्याच झटकन कोसळला : ८ जानेवारी २००८ ला बंद होताना असलेल्या २०,८७३ वरून निर्देशांक १७ ऑक्टोबर २००८ ला १०,००० च्या खाली आला.[१४६] शेअरबाजाराच्या धडपडीमुळे मध्यमवर्गीयांची जुगारी कमाई बंद झाली; अनेकांची आयुष्यभराची कमाई नष्ट झाली, तर अनेक कर्जबाजारी झाले.

## भाग सहा
## आर्थिक भोवऱ्याची कोंडी

जागतिक बँकेच्या आर्थिक सुधारणांच्या अटींमधे असलेला अत्यंत महत्वाचा भाग म्हणजे अर्थव्यवस्थेची दारे सट्टेबाज भांडवलदारांना (ह्याला परकीय संस्थात्मक गुंतवणूकदार म्हणजेच Foreign Institutional Investors किंवा FIIs पण म्हणतात) खुली केली.

### पश्चिमेतील वित्तिय स्फोट



मक्तेदारी भांडवलशाहीच्या अंगभूत तत्वांप्रमाणे (जागेच्या अभावी आम्ही त्याची इथे चर्चा करू शकत नाही) अमेरिका आणि इतर विकसित देशांच्या अर्थव्यवस्था १९७० च्या दशकापासून संकटग्रस्त झाल्या आहेत. पुन्हा एकदा त्या **कायमस्वरुपी मंदीच्या** विळख्यात जखडल्या गेल्या आहेत. म्हणजे त्यांची अर्थव्यवस्था हळूहळू मंद होऊ लागली आहे. त्यांच्या MNCs कडे

असलेल्या प्रचंड भांडवलाच्या गुंतवणुकीच्या नव्या संधी जवळजवळ संपुष्टात आल्या आहेत.

ह्यामुळे एक विचित्र गोष्ट झाली - वित्तीय स्फोट. जसजशी परिस्थिती गंभीर होत गेली, तसतसे महाकाय कंपन्या, तसंच बँका आणि वित्तीय संस्थांनी शेअरबाजारात अब्जावधी डॉलर्स ओतायला सुरुवात केली. नवीन शेअर्समध्ये नव्हे, ते तर नव्हतेच - कारण मंदीमुळे भांडवलदार नवीन कारखाने उभे करत नव्हते. म्हणून गुंतवणूकदारांनी अक्षरशः अब्जावधी डॉलर्स सट्टेबाजारात गुंतवायला सुरुवात केली ज्याचा उत्पादनाशी, उत्पादक अर्थव्यवस्थेशी, काहीही संबंध नव्हता. शेअर्सच्या किंमती वाढतील आणि मग ते विकून पैसा कमावता येईल, या अपेक्षेने ते आधीपासून अस्तित्वात असलेल्या कंपन्यांचे शेअर्स खरेदी करू लागले. जसंजसा शेअरबाजारात भांडवलाचा ओघ वाढत गेला, गुंतवणूकदारांसाठी वित्तिय साधनांचे नवनवीन अनोखे प्रकार अस्तित्वात आणले गेले - वायदे (Futures), वायद्याच्या सौद्यांचे विकल्प (Options on Futures), अदलाबदल (Swaps), इ.इ.[१४७]

ह्या सट्टेबाजीच्या स्फोटाने चमत्कारिक उधाण आले आहे. रोजची उलाढाल अक्षरशः हजारो अब्जावधी डॉलर्सची आहे. आंतरराष्ट्रीय वित्तीय व्यवहारांपैकी बऱ्याच मोठ्या भागाचा आज – जागतिक कीर्तीचे विद्वान नॉम चॉमस्की यांच्या मते ९५% पेक्षा जास्त – वस्तूंच्या अथवा सेवांच्या उत्पादनाशी काहीही संबंध राहिलेला नाही, ते फक्त सट्टेबाज स्वरुपाचे आहे;[१४८] म्हणजेच ते रोजगार निर्माण करत नाही, त्याचा सामान्य माणसांना कुठल्याही प्रकारचा फायदा नाही. जागतिकीकरणाच्या नावाखाली विकसित देश जगाच्या अर्थव्यवस्थेवर प्रभुत्व गाजवत आहेत व विकसित देशांच्या अर्थव्यवस्थांवर आता सट्टेबाज भांडवलाचे वर्चस्व आहे.

### भारतीय अर्थव्यवस्थेचे सट्टेबाज भांडवलावर अवलंबन

१९९१ मधील देशात झालेल्या परकीय चलन संकटावर तोडगा म्हणून भारतीय अर्थव्यवस्थेच्या जागतिकीकरणाची सुरुवात झाली.

भाग ३ मध्ये केलेल्या विश्लेषणाप्रमाणे ह्याने फक्त मलमपट्टी केली. पण भविष्यात संकट अधिक गंभीर होईल अशी परिस्थिती निर्माण केली. परकीय कर्जाचा आकडा तिप्पट होऊन २२१ अब्ज डॉलर्सवर पोहोचला आहे. २००७-०८ मध्ये व्यापारातील तूट वाढून ९० अब्ज डॉलर्स झाली आहे.



चालू खात्यातील वाढणारी तूट भरून काढण्यासाठी सरकारने सॉफ्टवेअरची निर्यात आणि परदेशस्थ नागिरकांनी पाठवलेले परकीय चलन ह्याचा वापर केला, पण तो पुरेसा नाही.

उरलेली तूट भरून काढण्याचा आणखी एक उपाय म्हणजे FDI साठी दरवाजे उघडणे. पण सरकारने सर्व प्रयत्न करूनही, देश विकायला काढूनही, FDI ची आवक मर्यादितच राहिली. पुढे जाऊन FDI च्या आवकीमुळे नफ्याची जावक मात्र वाढली.

आणि म्हणूनच सरकारने चालू खात्यातील तूट भरून काढण्यासाठी १९९२ मध्ये विकसित देशांच्या सट्टेबाज भांडवलासाठी भारतीय अर्थव्यवस्था उघड केली. तेव्हापासून ह्या भांडवलाचा प्रचंड ओघ सुरू झाला. ह्याच आवकीमुळे देशाच्या परकीय चलन साठ्यामध्ये वाढ होऊन तो ह्या वर्षी ३०० अब्ज डॉलर्सच्या वर पोहोचला आहे.

काही आकड्यांवरून आपण हे समजून घेऊ शकतो. एप्रिल ते डिसेंबर २००७ च्या दरम्यान व्यापारातील तूट ६६.५ अब्ज डॉलर्स होती. पण परदेशस्थ नागरिकांनी पाठवलेले डॉलर्स (१३.८ अब्ज), सॉफ्टवेअरची निर्यात (२७.५ अब्ज डॉलर्स), आणि इतर काही मिळकतींमुळे ह्या काळातील चालू खात्याची तूट १६ अब्ज डॉलर्स होती. ही तूट भांडवलाच्या आयातीतून भरून काढण्यात आली. पण परकीय भांडवलाचा ओघ तुटीपेक्षा खूपच जास्त होता : २००७-०८ ह्या वित्तीय वर्षातील पहिल्या नऊ महिन्यात निव्वळ परकीय भांडवलाची आवक ८३.२ अब्ज डॉलर्स होती, पैकी सट्टेबाज भांडवलाचा हिस्सा ३३ अब्ज डॉलर्स होता. ह्या भांडवलाच्या ओघामुळे भारत सरकारच्या परकीय चलन खात्यात तीव्र वाढ झाली - ७६ अब्ज डॉलर्स एवढी.[१४९]

ह्या अतिशय चंचल भांडवलाला आकर्षित करण्यासाठी भारत सरकार त्यावर असलेले सर्व निर्बंध हळूहळू समाप्त करत आहे. काही काळापूर्वी 'हेज फंड' सारख्या कुविख्यात, कुप्रसिद्ध सट्टेबाज कंपन्यांनासुद्धा भारतीय बाजारात गुंतवणूक करायला त्यांनी परवानगी दिली. एवढंच नाही, तर ह्या लुटारुंना सर्व नीतिनियम धाब्यावर बसवून भन्नाट सवलती दिल्या जात आहेत. उदा. भारत सरकारने मॉरिशसबरोबर 'दुहेरी कर टाळण्यासाठी करार' केला आहे. FIIs ना आता एवढंच करायचं आहे की भारतातील गुंतवणूक मॉरिशस मार्फत करायची आहे, आणि मग त्यांच्या अब्जावधी रुपयांवर एक नवा पैसा टॅक्स भरावा लागणार

नाही (भारतातही नाही आणि मॉरिशस मध्येही नाही - कारण तिथे भांडवली नफा करमुक्त आहे)![१५०]

**आणखी एका वित्तीय अध:पतनाकडे**

FIIs आपले सट्टेबाज भांडवल फक्त कम्प्यूटरची एक कळ दाबून देशातून बाहेर घेऊन जाऊ शकतात. आणि म्हणून जागतिकीकरणाचा कट्टर समर्थक असलेल्या 'टाइम्स ऑफ इंडिया'ने सुद्धा काही काळापुर्वी एका संपादकीयामधून धोक्याची सूचना दिली, "भारताची व्यापारातील तूट सुरक्षित पातळीमध्ये राहीलेली नाहीये... सरकारच्या आर्थिक सल्लागार परिषदेनुसार चालू खात्यातील तूट जवळपास १८ अब्ज डॉलर्स आहे. ही तूट भरून काढण्यासाठी भारताला FIIs वर अवलंबून रहावं लागणार आहे... चालू खात्यातील तूट भरून काढण्यासाठी FIIs च्या आवकीवर विश्वास ठेवून चालणार नाही. FIIs जेवढ्या सहज मोठ्या प्रमाणात भांडवलाची गुंतवणूक करतात, तेवढ्याच झटकन भांडवल बाहेर घेऊन जाऊ शकतात."[151]

गेल्या ६ महिन्यात, १९९१ प्रमाणेच भारतातील परकीय चलन साठ्याच्या भरभराटीच्या अध:पतनाची परिस्थिती निर्माण व्हायला सुरुवात झाली आहे.

चालू वित्तीय वर्षाच्या पहिल्या ६ महिन्यात (एप्रिल-सप्टेंबर २००८) व्यापारातील तूट गेल्या वर्षीच्या ह्याच काळाच्या तुलनेत ५३% वाढली आहे.[१५२] ऑक्टोबरमध्ये स्थिती अजूनच बिघडली. जागतिक आर्थिक मंदीमुळे, एप्रिल ते सप्टेंबरच्या काळात ३०% नी वाढलेली निर्यात ऑक्टोबरमध्ये १५% नी कमी झाली (गेल्या वर्षीच्या ऑक्टोबरच्या तुलनेत).[१५३] ह्यावर्षी हात राखून केलेलं अनुमान असं आहे की व्यापारघाटा १२५ अब्ज डॉलर्सवर जाऊन पोहोचेल.[१५४]

'दी हिंदू' ह्या वर्तमानपत्रातील एका संपादकीयाने मान्य केले आहे, "परिस्थिती आधीच्या काळापेक्षा उलट झाली आहे, परदेशस्थ नागिरकांनी पाठवलेले परकीय चलन आणि सेवाक्षेत्राच्या निर्यातीने तूट कमी करण्यास मदत केलेली नाही... अमेरिकेमध्ये आलेल्या मंदीमुळे सॉफ्टवेअर निर्यात आणि अन्य सेवांच्या निर्यातीमुळे होणारे उत्पन्न कमी होण्याची शक्यता आहे."[155]





म्हणून FIIs चिन्तित आहेत. त्यांनी आपला पैसा बाहेर काढायला सुरुवात केली आहे. गेल्या ६ महिन्यात आपल्या विदेशी मुद्रा भांडारात ६३ अब्ज डॉलर्सची घसरण झाली आहे. तरीही, भारताजवळ २४६ अब्ज डॉलर्स विदेशी मुद्रा भांडार आहे. खरंतर काळजीचं काहीच कारण नव्हतं.

पण वर म्हटल्याप्रमाणे, FIIs जितक्या सहज गुंतवणूक करू शकतात, तेवढ्याच सहजतेने आपला पैसा बाहेर घेऊन जाऊ शकतात. आपली परकीय देणी वेगाने वाढत आहेत. भारताच्या विदेशी कर्जापैकी कमीत कमी ८० अब्ज डॉलर्स पुढच्या वर्षी फेडावं लागेल.[१५६] ह्यावर्षी (२००८-०९) वेगाने वाढणारा व्यापारघाटा १२५ अब्ज डॉलर्स अपेक्षित आहे. हे दोन्ही जोडले तर २०५ अब्ज डॉलर्स होतात. म्हणजे FIIs १०० अब्ज डॉलर्स जरी बाहेर घेऊन गेले, तरी भारतीय अर्थव्यवस्था पुन्हा एकदा परकीय चलनसाठ्याच्या दिवाळखोरीच्या कड्यावर येऊन उभी राहील.

सरकारी प्रवक्ते अजूनही दावा करतातच आहेत की अर्थव्यवस्थेला काहीही धोका नाही. पण अर्थमंत्रालय आर्ततेने देशाचा परकीय चलन साठा वाढवण्यासाठी निरनिराळे मार्ग शोधत आहे. २३ नोव्हेंबर २००८ ला 'इंडियन एक्सप्रेस' मध्ये छापलेल्या बातमीनुसार : भारत सरकार अमेरिकेच्या फेडरल रिझर्व्ह बँक किंवा युरोपियन सेंट्रल बँकेबरोबर चलनी देवाणघेवाणीच्या व्यवस्थेवर विचार करत आहे; ह्यात भारतीय रिझर्व्ह बँकेला जेव्हा गरज पडेल तेव्हा डॉलरमध्ये उधारी मिळेल. 'इंडियन एक्सप्रेस'ने ह्यावर सहमती दाखवून टिप्पणी केली "ह्यामुळे परकीय चलनाच्या स्थितीवरील विश्वास वाढेल, गुंतवणूकदारांचा विश्वास वाढेल..."[157]

आर्थिक महासत्ता सहज ढासळणाऱ्या मातीच्या पायावर उभी आहे.

**दिल्लीमध्ये नवीन 'व्हाइसरॉय'**

जगाच्या बाजारात फुकट काहीच मिळत नाही. भारतीय अर्थव्यवस्थेला पुन्हा एकदा संकटात पाहून, विदेशी गुंतवणूकदार आणि त्यांचे दलाल यांनी जागतिक बँकेने, आर्थिक सुधारणा वेगाने पुढे न्याव्या अशी मागणी केली आहे.

आणि म्हणून त्यांनी आर्थिक सुधारणांच्या देखरेखीसाठी एक नवा 'व्हाइसरॉय' नवी दिल्लीत पाठवला आहे. ३ नोव्हेंबर २००८ ला भारत सरकारने IMF चे एक भूतपूर्व मुख्य अर्थशास्त्री रघुरामन राजन ह्यांची पंतप्रधानांचे मुख्य आर्थिक सल्लागार ह्या पदावर नियुक्ति केली आहे. राजन आधी, वित्तीय क्षेत्रातील

सुधारणांसाठी पंतप्रधानांनी स्थापन केलेल्या समितीचे अध्यक्ष होते.[१५८] राजनच्या नियुक्तीचा स्पष्ट अर्थ हा, की वित्तीय क्षेत्रातील सुधारणांना वेग येणार आहे - म्हणजे विमा क्षेत्राचं खाजगीकरण, बँकांचं खाजगीकरण, विदेशी सट्टेबाजांना ह्या देशात गुंतवणुकीसाठी अजून अधिक सूट. ही तीच धोरणं आहेत, ज्यामुळे अमेरिका १९३० च्या दशकातल्या महामंदीनंतरच्या सगळ्यात गंभीर आर्थिक मंदीच्या संकटात फसली आहे. अमेरिकेची वित्तीय गिधाडे त्यांच्या देशातील मंदीमुळे गंभीर संकटात आहेत. म्हणूनच भारत सरकारने भारताच्या वित्तीय संस्थांचं लवकरात लवकर खाजगीकरण करावं अशी त्यांची मागणी आहे, म्हणजे मग ते भारतीयांच्या आयुष्यभराच्या करोडो रुपयांच्या बचतीवर डल्ला मारू शकतात आणि अब्जावधी डॉलर्सचा नफा कमावू शकतात.

स्वातंत्र्य मिळवून अर्धशतकही उलटले नाही तर ते जात चालल्याबद्दल दुखवटा पाळण्याची आपल्यावर वेळ आली आहे. केवढी ही अधोगती! डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बहुधा याचीच भीती वाटली असल्यामुळे घटना समितीपुढे आपल्या शेवटच्या भाषणात बोलताना ते म्हणाले होते की :

**"भारत २६ जानेवारी १९५० रोजी एक स्वतंत्र, सार्वभौम राष्ट्र होईल. त्याचं भविष्यात काय होईल याची काळजी मला वाटते. लाखोंच्या असीम त्यागातून मिळविलेले हे मौल्यवान स्वातंत्र्य हा देश राखू शकेल का?**

**"मला सतत हा प्रश्न बेचैन करतो. त्याचे कारण भारताने आपले स्वातंत्र्य एकदा गमावले होते. ते परत एकदा गमावेल का? मला जी गोष्ट जास्त बेचैन करते ती ही की भारताने आपले स्वातंत्र्य गमावले तर होतेच, पण ते देशद्रोही आणि विश्वासघातकी लोकांमुळे गमवावे लागले होते ही होय."**



दुर्दैवाने डॉ.आंबेडकरांची ही भीती आज खरी ठरू पाहत आहे.



# भाग सात
# लोकांवर होणारे परिणाम

## (क) मोठ्या प्रमाणात रोजगार नष्ट

### औद्योगिक रोजगार कुठे आहे?

जागतिकीकरणाच्या सुरुवातीच्या काळात, सार्वजनिक आणि खाजगी दोन्ही क्षेत्रांमध्ये थोड्याफार प्रमाणात नोकऱ्यांमध्ये वाढ होत होती.

पण जसजसं जागतिकीकरण आणि खाजगीकरण पुढे रेटलं गेलं (म्हणजे सार्वजनिक क्षेत्र बंद होण्याचं प्रमाण वाढायला लागलं), तसतशी सार्वजनिक व खाजगी दोन्ही क्षेत्रातील नोकऱ्यांना घरघर लागली. १९९६ ते २००५ ह्या कालावधीत सरकारी क्षेत्रातील १४.१ लाख नोकऱ्या कमी झाल्या; ह्याच क्षेत्रात १९८१ ते १९९६ ह्या कालावधीत ३९ लाख नोकऱ्या निर्माण झाल्या होत्या. त्याचप्रमाणे, खाजगी संघटित क्षेत्रामध्ये १९९८-२००५ मध्ये ३ लाख रोजगार कमी झाले; ह्या क्षेत्रात १९९१ ते १९९८ ह्या कालावधीत १० लाख (आणि १९८१-९८ मध्ये १३.६) रोजगार निर्माण झाले. GDP दरवर्षी ५% नी वाढत असतानाही![१५९]



ह्यात आश्चर्य वाटण्याचे काही कारण नाही. MNCs भारतात आल्यामुळे खाजगी क्षेत्राला आपला ढाचा बदलणे भाग पडले. एका बाजूला ह्या मोठ्या उद्योगघराण्यांचं उत्पादन व नफा वाढत आहे तर दुसऱ्या बाजूला ते लाखो कामगारांना कामावरून काढून टाकत आहेत. उदा. १९९९ मध्ये टाटा मोटार्सच्या ३५,००० कामगारांनी १,२९,००० मोटारींच उत्पादन केलं होतं. ५ वर्षांनंतर, उत्पादन अडीच पट वाढलं आणि ३,१२,००० गाड्यांवर जाऊन पोचलं. पण कामगारांची संख्या एक तृतीयांशने कमी होऊन २१,००० झाली.[१६०] बजाजमध्ये १९९५ मध्ये २३,००० कामगार १० लाख दुचाकींचं उत्पादन करत होते; एका दशकानंतर २००४ मध्ये मात्र ११,००० कामगार १५ लाख दुचाकी बनवत होते![१६१] हीच परिस्थिती सर्व बड्या उद्योगांची आहे, क्रॉम्प्टन ग्रीव्ज पासून रिलायन्स पर्यंत.

आपण वर पाहिलंच आहे की लघुउद्योग क्षेत्रही झपाट्याने नष्ट होतं आहे.

परिणामी सगळ्या संघटित क्षेत्रातील एकूण रोजगार (म्हणजे सार्वजनिक आणि खाजगी संघटित क्षेत्रांत मिळून, दुसऱ्या शब्दात भारतात असलेल्या सर्व पंजीकृत कारखान्यांमधील) १९९० च्या दशकाच्या शेवटापासून खूप वेगाने कमी झाला आहे: १९९८-२००५ मध्ये १७ लाख कामगार कमी झाले. जागतिकीकरणाची सुरुवात झाल्यानंतर १९९१ ते २००५ दरम्यान संघटित क्षेत्रातील एकूण कामगारांची संख्या वाढण्याऐवजी उलट २.७ लाखांनी कमी झाली आहे.[१६२]

**तक्ता क्र. २:**

**भारतातील संघटित क्षेत्रातील रोजगार, १९९१-२००५ (लाखात)**

| Year | Public Sector | Private Sector | Total |
|---|---|---|---|
| 1991 | 190.6 | 76.8 | 267.3 |
| 1998 | 194.2 | 87.5 | 281.7 |
| 2005 | 180 | 84.5 | 264.6 |

यावरून हे स्पष्ट होते की MNCs मुळे निर्माण होणाऱ्या मूठभर रोजगारांपेक्षा नष्ट होणारा रोजगार खूपच जास्त आहे.

भांडवलदार वर्ग निर्ममपणे स्वत:चा नफा पहातो. देशातील वाढती बेरोजगारी आणि कमजोर कामगार चळवळी यांचा गैरफायदा घेऊन राज्यकर्ते कष्टकरी वर्गाला दिलेल्या सर्व सवलती काढून घेत आहेत. कायमस्वरुपी कामगारांच्या जागी कंत्राटी किंवा रोजंदारीवर कामगार घेतले जात आहेत. जे काही थोडेफार रोजगार शिल्लक उरले आहेत, त्यांचा दर्जाही घसरलेला आहे. कामगार १० ते १२ तास काम करतात. त्यांना ओव्हरटाइम दिला जात नाही. सुट्टी दिली जात नाही. कामगारांच्या तारुण्यातील (निर्मिती क्षमतेतील) चांगली वर्ष पिळून घ्यायची आणि ४० व्या वर्षीच त्यांचा चोथा करून वापरून फेकून देण्याची विनाशकारी धोरणं, अधिक नफ्याला चटावलेले इथले हरामखोर भांडवलदार निर्लज्जपणे लादत आहेत. या सगळ्या गोष्टी करणं या





बड्या धेंडांना सोप्पं जावं म्हणून कामगारांना किमान सुरक्षा देणारे कामगार कायदे मूळापासून बदलले जात आहेत.

**पण सॉफ्टवेअर आणि बी.पी.ओ. क्षेत्राचे काय?**

सॉफ्टवेअर आणि बीपीओ क्षेत्रांत भरपूर रोजगार निर्माण होत आहेत, असा प्रचार सध्या केला जात आहे. पण वस्तुस्थिती ह्याच्या ठीक उलट आहे. माहिती तंत्रज्ञान क्षेत्राचे दोन विभाग आहेत. एक म्हणजे सॉफ्टवेअर क्षेत्रं आणि दुसरं त्यावर अवलंबून असलेलं बीपीओ क्षेत्रं (Business Process Outsourcing). २००३ पर्यंत ह्या क्षेत्रांत अनुक्रमे ४ लाख ९० हजार आणि १ लाख ६० हजार रोजगार होते.[१६३] इतकेच. आणि २००७ पर्यंत ह्या क्षेत्रातील एकूण रोजगार, भरभराट असून सुद्धा, फक्त १६.३ लाख झाले होते.[१६४] म्हणजे देशांतल्या एकूण रोजगाराच्या एक टक्क्याच्या एक तृतीयांश - फक्त ०.३३% ! आणि हे विकसित देशांमध्ये घसरण चालू होण्यापूर्वी.

**शेतीक्षेत्रातील रोजगाराचा विनाश**

शेतीक्षेत्राला बसलेल्या वादळी तडाख्यामुळे १९९४-२००० च्या दरम्यान ह्या क्षेत्रातील रोजगारवाढीचा दर शून्यावर पोचला आहे - खरंतर प्रतिवर्षी ०.०२%. देशातील एकूण रोजगारापैकी दोन तृतीयांश रोजगार ज्या क्षेत्रांत उपलब्ध होतात, त्या क्षेत्रांची ही स्थिती. जर पूर्वीप्रमाणे ह्या क्षेत्रांत रोजगार वाढत राहीला असता, तर ह्या क्षेत्रात ह्या काळात २.७ कोटी रोजगार निर्माण झाले असते.[१६५]

**निव्वळ निष्पत्ती : रोजगार नष्ट होण्यात**

आणि म्हणूनच सरकारी आकडेही हे दर्शवतात की जागतिकीकरणाच्या नंतरच्या काळात रोजगार निर्मिती मध्ये परिणामकारक घसरण झाली आहे. NSS च्या १९८३, १९९३-९४ आणि १९९९-२००० च्या अहवालांमध्ये हे स्पष्ट दिसून येतं की रोजगार निर्मितीच्या वाढीमध्ये तीक्ष्ण घट झाली आहे: १९८३ ते १९९३-९४ च्या काळातील २.७% प्रतिवर्षी वरून ती १९९३-९४ ते १९९९-२००० च्या दरम्यान १.१% इतकी कमी झाली आहे. पहिल्या काळात दरवर्षी ७६ लाख नवीन रोजगार निर्माण होत होते, जे नंतरच्या काळात ३५ लाख प्रतिवर्षी इतके कमी झाले.[१६६]

**तक्ता क्र. ३: भारतातील रोजगाराची वाढ, १९८३ ते २०००**

| | Million person years | | | Growth per annum (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | 1983 | 1993-94 | 1999-00 | 1983 to 1993-94 | 1993-94 to 1999-00 |
| **Workforce** | 239.6 | 315.8 | 336.8 | 2.70 | 1.07 |

### मग नवीन रोजगार कुठल्या क्षेत्रांत निर्माण होत आहेत?

१९९३-९४ ते १९९९-२००० ह्या सहा वर्षांमध्ये भारतीय अर्थव्यवस्थेमध्ये २.१ कोटी नवीन रोजगार निर्माण झाले. मग हे कुठल्या क्षेत्रांमध्ये झाले?

- ५५ लाखांहून अधिक रोजगार अतिशय लहान उद्योग आणि घरेलू उत्पादनाच्या क्षेत्रांत निर्माण झाले आहेत. कुठेच रोजगार नसल्यामुळे लोक घरीच पापड, लोणची, वेफर्स, उदबत्त्या यांसारख्या छोट्या मोठ्या गोष्टी बनवून बाजारात विकण्याचा प्रयत्न करत आहेत. कशाही प्रकारे जिवंत राहण्यासाठी! खरंतर हे सगळे लोक बेरोजगारच आहेत. पण सरकारी आकड्यांमध्ये ह्या सगळ्यांची 'वस्तुनिर्माण (मॅन्युफॅक्चरिंग) क्षेत्रातील रोजगार' म्हणून गणना केली जाते.
- ४० लाख रोजगार असंघटित बांधकाम क्षेत्रांत निर्माण झाले आहेत. इथे तर कामगार अत्यंत भयानक परिस्थितीत काम करतात: पत्र्याच्या घरांमध्ये राहून, कुठल्याही आरोग्यसुविधा नसताना, मुलांच्या शिक्षणाची कसलीही सोय नसताना. तरीही भारताच्या भरभराटी अर्थव्यवस्थेत निर्माण झालेले ७ पैकी १ रोजगार या क्षेत्रात आहे!
- सगळ्यात जास्त रोजगार निर्मिती सेवा क्षेत्रात झाली: १.१५ कोटी. ह्यातील सगळ्यात मोठा हिस्सा, म्हणजे १.०७ कोटी रोजगार, "व्यापार, हॉटेल आणि रेस्टॉरन्टस्" या क्षेत्रांचा आहे. "व्यापार" म्हणजे: रस्त्यावर गाडी लावून फळं-भाज्या विकणारे, दारोदार फिरून शाम्पू, साबण, वॉटर फिल्टर सारख्या गोष्टी विकणारे वा अन्य प्रकारचे छोटे छोटे विक्रेता. "हॉटेल-रेस्टॉरन्टस्" म्हणजे : छोटी छोटी चहाची दुकाने, वडापावची गाडी टाकून धंदा करणारे, किंवा मॅकडोनल्डसारख्या हॉटेल मध्ये काम करणारी मुलं.[१६७]





होय, जागतिकीकरणानंतर भारतीय अर्थव्यवस्थेत तयार होणारे रोजगार हेच आहेत. ह्यांना 'रोजगार' म्हणणं निर्लज्जपणा आहे. मरणाच्या कडयावर असलेले हे लोक काहीतरी करून किमान एक वेळच अन्न खाऊन जिवंत आहेत.

### अर्जुन सेनगुप्तांचा अहवाल

ही सर्व उद्वेगजनक तथ्यं एन.सी.ई.यू.एस.ने ऑगस्ट २००७ मध्ये भारत सरकारला दिलेल्या "असंघटित क्षेत्रातील कामाची स्थिती" ह्या अहवालानेही सिद्ध होतात. ह्या अहवालानुसार, भारतीय अर्थव्यवस्थेची भरभराट, उंच विकास दर, गुंतवणूक व बचतीचा उंच दर आणि निर्यातीतील लक्षणीय वाढ समाजातल्या अधिकांश जनतेपर्यंत पाहोचलेली दिसत नाही. अहवालामध्ये पुढे हे नमूद केले आहे : २००४-०५ च्या शेवटी ८३.६ कोटी किंवा ७७ टक्के लोकांची दिवसाची कमाई २० रुपयांपेक्षा कमी होती; हे भारताच्या अनौपचारिक अर्थव्यवस्थेचा भाग आहेत, रोजगाराचं कुठलही कायदेशीर संरक्षण आणि कामाच्या ठिकाणी सामाजिक सुरक्षा नाही. अशा अतिशय हलाखीच्या परिस्थितीत जीवन कंठणारे हे लोक 'चकचकीत भारताच्या कहाणी'तून वगळलेले आहेत.[१६८]

### आर्थिक मंदीमुळे अजूनच रोजगारांवर घाला

आपण ५व्या भागात पाहिलंच आहे की भारतीय अर्थव्यवस्थेला घरघर लागली आहे. गंभीर होत चाललेल्या ह्या संकटाचा असंघटित क्षेत्रांतल्या कामगारांवर भयंकर परिणाम होत आहे. बहुतेक कारखान्यांमधून आज मोठ्या प्रमाणावर कंत्राटी कामगार काम करत आहेत. जसजशी मागणी कमी होत जाते तसंतसे कंत्राटी कामगारांना कामावरून काढून टाकले जात आहे. हंगामी असल्यामुळे त्यांना कसलीच नुकसानभरपाई देण्याची गरज नसते. अशाप्रकारे हजारो कामगारांना कामावरून काढून टाकलेलं आहे. त्याचप्रमाणे, बांधकाम उद्योगातील मंदीचा परिणाम बांधकाम मजूरांवरही झाला आहे. हजारोंच्या संख्येने ते गावाकडे परत गेले आहेत.



असंघटित क्षेत्राची परिस्थिती तर आणखी गंभीर आहे. निर्यातीशी संबंधित सर्व क्षेत्रांमध्ये मंदी असल्यामुळे लाखोंच्या संख्येने असंघटित कामगारांचा रोजगार संपुष्टात आला आहे

कापडउद्योगातील कामगारांपासून गुजराथमधील हिऱ्यांना पैलू पाडणाऱ्या कामगारांपर्यंत.

## (ख) गरिबांवरील अनुदाने काढून घेणे



आजारपणाच्या थकलेल्या बिलांमुळे आत्महत्या करणारे शेतकरी, अमानवीय परिस्थितीत राहणारे शहरी गरीब, मेळघाटात भूकेने मरणारे आदिवासी, स्वच्छ पिण्याचे पाणी न मिळाल्यामुळे होणाऱ्या हगवणी सारख्या आजाराने मरणारी मुले, ह्यांच्याबद्दल भारतीय शासकांना काडीमात्र काळजी नाही. ते जागतिक बँकेने घातलेल्या अजून एका अटीचं कर्तव्यदक्षतेने पालन करत आहेत : गरिबांची सर्व अनुदाने काढून घेणे.

'जागतिकीकरणाच्या' दुटप्पी धोरणांनुसार, धनदांडग्यांना देण्यात येणाऱ्या हजारो कोटींच्या अनुदानांना 'प्रोत्साहन' असं गोंडस नाव देऊन योग्य ठरवलं जात आहे. धनदांडग्यांवर उधळलेल्या प्रोत्साहनांची काही उदाहरणे :

- "निर्यातीला चालना" नावाखाली अक्षरशः हजारो कोटी रुपयांचे निर्यातदारांना अनुदान.[१६९]
- मोठ्या उद्योगसमूहांना सार्वजनिक बँका आणि वित्तीय संस्था यांनी दिलेली अवाढव्य कर्जे माफ. पी. साईनाथ ह्यांच्या मते गेल्या ५ वर्षांत ४५००० कोटी रुपये माफ केले गेले आहेत.[१७०] म्हणजेच गेल्या १० वर्षांत एकूण माफ केलेल्या कर्जाची रक्कम नक्कीच १ लाख कोटी रुपयांपेक्षा जास्त असणार. थकबाकीदारांच्या यादीमध्ये या देशातल्या आघाडीच्या उद्योगसमूहांचा समावेश आहे.[१७१]
- देशाची संपदा कवडीमोल किंमतीत बड्या उद्योगसमूहांना देऊन टाकणे : तेल, खनिज, जंगले, ह्यासारखे नैसर्गिक स्त्रोत आणि सार्वजनिक उद्योग खोऱ्याने नफा कमावण्यासाठी त्यांच्या हातात सुपूर्द केले जात आहेत.
- प्रत्यक्ष करांमध्ये धनदांडग्यांना सूट : २००७-२००८ मध्ये अबकारी कर, सीमा शुल्क निगम कर आणि कंपनी कर ह्यामध्ये 'प्रोत्साहन' म्हणून कॉरपोरेट उद्योगांना २.३६ लाख कोटी रुपयांची सूट देण्यात आली. ही रक्कम देशात त्यावर्षी जमा झालेल्या एकूण कराच्या रकमेच्या निम्मी होती.[१७२]



- विशेष आर्थिक क्षेत्र, सरकारी-खाजगी भागीदारी, इ.इ. नावांखाली अप्रत्यक्ष रीत्या दिल्या जाणाऱ्या करांमध्ये सवलती कोट्यवधी रुपयांमध्ये आहेत.
- अशा प्रचंड प्रमाणात करांमध्ये सवलती मिळाल्यानंतर धनदांडगे कायद्यानुसार जे काही थोडेफार कर भरायला पाहिजेत ते सुद्धा भरत नाहीत. मार्च २००८ पर्यंत त्यांच्यावर ३९,००० कोटी रुपयांचा कॉरपोरेशन टॅक्स आणि २०,००० कोटी रुपयांचा सीमा शुल्क, अबकारी कर आणि सेवा कराची थकबाकी होती.[१७३]



आणि दुसऱ्या बाजूला सरकार गरिबांना अन्न, वस्त्र, निवारा, पाणी, आरोग्य, वीज ह्यांसारख्या गरजेच्या गोष्टी स्वस्त आणि परवडणाऱ्या किंमतीत उपलब्ध व्हाव्यात यासाठी देण्यात येणाऱ्या अनुदानांमध्ये कपात करत आहे. अमेरिकेच्या रक्तपिपासू शासकांनुसार आजारी रुग्णालये, मोडकळीस आलेल्या शाळा, दूषित पाणी ह्यावर सरकारने खर्च करणं म्हणजे गरिबांना बांडगुळ बनवणे असे वाटते. पण ह्याच MNCs "मुक्त बाजार" व्यवस्थेमध्ये जेव्हा कोसळतात - जसं आत्ता अमेरिकेत घडतयं - तेव्हा मात्र त्यांना सरकारने मदत केली पाहिजे : आत्तापर्यंत अमेरिकी सरकारने ह्या धनदांडग्यांना वाचवण्यासाठी जनतेच्या जीवावर २००० अब्ज डॉलर्स खर्च केले आहेत.

एवढंच नाही तर, ह्या सर्व अत्यंत अत्यावश्यक सेवांचं खाजगीकरण पण केलं जात आहे. आरोग्य, पिण्याचे पाणी, शिक्षण या सर्वांना नग्न नफेखोरीचे साधन बनवले जात आहे. अत्यावश्यक सेवा असल्यामुळे ह्यात अफाट नफा कमावला जाऊ शकतो.

आपल्या पंतप्रधानांनी स्पष्ट केलं आहे की "सरकार म्हणजे काही धर्मशाळा नव्हे". तुमच्याकडे पैसे असतील तर तुम्ही केंटुकी फ्राईड चिकन आणि मॅकडोनल्डस्‌चा बर्गर खाऊ शकता, पिअरी कार्दीनचे टी-शर्ट आणि लेवी जीन्स घालू शकता - हे सगळं आता भारतात उपलब्ध आहे. पण जर तुमच्याकडे पैसे नसतील, तर तुम्हाला सर्दीनी मरायचं का भूकेनी ह्याच स्वातंत्र्य आहे, किंवा मग जिवंत राहण्यासाठी किडनी विकायची, मुलांना विकायचं का स्वतःला ह्याचंही 'मुक्त बाजारा'त स्वातंत्र्य आहे.

आम्ही गोष्टी रचून सांगत नाही. हे पुढे स्पष्ट होईल.

## १) सार्वजनिक आरोग्य व्यवस्थेची पडझड



आपलं सरकार सार्वजनिक आरोग्य व्यवस्थेवर खूपच कमी खर्च करते. GDPच्या प्रमाणात पाहता, जगभरात भारताचा नंबर शेवटून पाचवा आहे, अफ्रिकेच्या गरीब देशांच्याही खाली.[१७४] त्यामुळे मुळातच रोगट असलेल्या सार्वजनिक आरोग्यव्यवस्थेला आता मारून टाकले जात आहे. सरकारी इस्पितळांचे हळूहळू खाजगीकरण होत आहे. औषधांच्या किंमतींवरील नियंत्रणे काढून टाकली जात आहेत. भारतीय पेटंट कायद्यामुळे भारतीय औषध कंपन्यांनी एडस्‌वरील औषधांची किंमत प्रतिव्यक्ती प्रतिवर्षी ६ लाख रुपयांवरून १०,००० रुपयांवर आणली - आफ्रिका, लॅटिन अमेरिका आणि आशिया खंडातल्या गरीब देशांमधल्या ७ लाख एड्‌सच्या रूग्णांना त्यामुळे जीवनदान मिळालं होतं. पण आता बहुराष्ट्रीय औषध कंपन्यांच्या दबावामुळे भारतीय पेटंट कायदा अशा पद्धतीने बदलला गेला आहे की भारतीय औषध कंपन्या एड्‌सची नवीन औषधं आता बनवू शकणार नाहीत, आणि मग MNCs मक्तेदारी किंमतींवर ती विकू शकतील.[१७५]

यामुळे सर्वसामान्य माणसाचा आरोग्यावरील खर्चाचा ताण वाढला आहे. देशात आरोग्यावर होणाऱ्या एकूण खर्चापैकी तीन चतुर्थांश खर्च लोक स्वतःच्या खिशातून करतात, तर सरकार फक्त २२% करते. याचाच अर्थ भारतात आरोग्यसेवांचं खाजगीकरण जगात सर्वात जास्त आहे.[१७६] एका बाजूला उद्योगपती पंचतारांकीत इस्पितळे उघडून पश्चिमी आणि अरब देशांतील मध्यमवर्गाचा “मेडिकल टुरिझम” च्या नावावर इलाज करून कोट्यवधी रुपये नफा कमावत आहेत, तर दुसरीकडे जवळपास २० कोटी लोकांनी कुठल्याही प्रकारचा इलाज करणे सोडून दिले आहे, कारण त्यांना तो खर्च परवडतच नाही.[१७७]

निष्कर्षः अर्भक, बालमृत्यू आणि बाळंतपणातील मृत्यूंमध्ये भारत जगाचा नेता आहे. जागतिक आरोग्यसंघटनेच्या (World Health Organisation किंवा WHO) अहवालानुसार[१७८]:-

- जगातील अर्भकमृत्यूंच्या ३०% भारतात होतात. दरवर्षी भारतात १२ लाख अर्भके जन्मानंतरच्या पहिल्या ४ आठवड्यात मरतात!
- जगातील एकूण बालमृत्यूंपैकी ६७% भारतात होतात.



- भारतात मातांच्या मृत्यूचे प्रमाणही जगभरात सर्वात जास्त आहे; जगातील दरवर्षी होणाऱ्या ५ लाख ३६ हजार मातामृत्यूंपैकी १ लाख ४० हजार भारतात होतात. म्हणजेच २५%!

तरीही, भारतातील धनदांडगे म्हणतात : भारत महासत्ता बनत आहे. डॉलर खरबोपतींच्या संख्येत भारत जगातील चौथ्या क्रमांकावर आहे.

## २) ज्ञानाच्या क्षेत्रात महासत्ता हाही एक विनोदच

जगभरात सर्वात जास्त निरक्षरतेचं प्रमाण असलेल्या देशांमध्ये भारत गणला जातो. सरकारी आकड्यांप्रमाणे देशातील ६ ते १४ वयोगटातील ८०% मुले शाळेत जातात. पण वस्तुस्थिती विपरीत आहे.[१७९] देशातील ६ ते १४ वयोगटातील निम्म्यापेक्षा जास्त मुले शाळेत जात नाहीत हे पंतप्रधान मनमोहन सिंगनीही मान्य केलं आहे. जे पहिलीत शाळेत प्रवेश घेतात त्यापैकी ५३% आणि ३४% मुले पाचवीत व आठवीत (अनुक्रमे) जाण्यापूर्वीच गळून जातात.[१८०]

काही वर्षांपूर्वी १९६५ मध्ये, सरकारने GDP च्या किमान ६% शिक्षणावर खर्च करावा, अशी शिफारस कोठारी आयोगाने केली होती. आजतागायत ह्या आकड्याच्या जवळपाससुद्धा सरकारने शिक्षणावर खर्च केलेला नाही. आणि आता, आर्थिक सुधारणांची सुरुवात झाल्यानंतर, आलेल्या सर्व सरकारांनी जागतिक बँकेच्या अटीनुसार शिक्षणावरचा खर्च अजूनच कमी केला आहे. १९९२ च्या GDP च्या ३.६% वरून घसरून तो २००७-०८ मध्ये २.९१% झाला आहे. शिक्षणावरचा खर्च वाढवला असल्याचा दावा सध्याचं सरकार करत असलं, तरी प्रत्यक्षात मात्र, GDP च्या २००१-०२ पेक्षा (तेव्हा तो २.९८% होता) कमी आहे.[१८१]

म्हणूनच, सरकारी शिक्षणव्यवस्थाही मोडकळीला आलेली आहे. भारतातल्या प्राथमिक शाळांमध्ये केलेल्या सर्वेक्षणामध्ये हे समोर आले की ९०,००० शाळांमध्ये फळे नाहीत! हजारो शाळांना इमारती नाहीत!! आणि १ लाखापेक्षा जास्त शाळा एकाच वर्गात चालवल्या जात होत्या!!![१८२]

ह्या कठोर वास्तवानंतरही, वॉशिंग्टनमध्ये बसलेल्या हरामखोरांना असं वाटतं की सरकारने शिक्षणावरील ‘अनुदाने’ अजून कमी करावीत. हे करत असताना, सर्व मुलांना मोफत आणि आवश्यक शिक्षण देण्याचे घटनात्मक कर्तव्य पार पाडत असल्याचा आभास मात्र सरकारने निर्माण केलाच पाहीजे. म्हणून जागतिक बँकेच्या मार्गदर्शनाखाली देशभर ‘शिक्षण केंद्रे’ उघडण्याची एक नवीन योजना राबवली जात आहे. ह्या ‘शाळां’मध्ये ८वी पास झालेल्या आणि कित्येक

ठिकाणी तर ५वी पास स्थानिक महिलांना 'शिक्षक' म्हणून नेमले जात आहे. 'विद्या सहाय्यक', 'शिक्षणसेवक' अशी गोंडस नावे त्यांना दिली आहेत. अशा प्रकारे एका कायमस्वरुपी शिक्षकाच्या जागी असे ३ ते ५ हंगामी शिक्षक नियुक्त करता येतात. हे अप्रशिक्षित 'शिक्षक' बहुतांशी वेळेला एकाच खोलीमध्ये अनेक वर्ग चालवत असतात. २००५ पर्यंत असे ४ लाख 'शिक्षक' नेमले गेले होते.[१८३] वा! काय 'idea' आहे.

सरकारी आकडेवारीत या शिक्षणकेंद्रात जाणारी मुले, नियमित शाळांमध्ये जाणाऱ्या मुलांप्रमाणेच धरली जातात.[१८४] लवकरच, ही शिक्षणकेंद्रे नियमित शाळांची जागा घेतील. ही प्रक्रिया मध्यप्रदेशमध्ये सुरू झाली आहे - तिथे कायमस्वरुपी शिक्षकांची श्रेणीच समाप्त केली जात आहे.[१८५]

### उच्च शिक्षणाचे खाजगीकरण



कुठल्याही देशाचे भवितव्य हे त्या देशातल्या लोकांच्या शिक्षणावर अवलंबून असते. उच्चशिक्षण घेण्यासाठी लोकांना जेवढ्या शिक्षणसंस्थांची गरज आहे तेवढ्या उपलब्ध करून देणे ही सरकारची जबाबदारी आहे - ज्या शिक्षणमंदिरांमध्ये माणसांच्या नैतिक, अध्यात्मिक, बौद्धिक सर्व प्रकाराच्यैदहा अव्यक्त गुणांना वाव मिळून ते गुण समोर येतील. समाजातील शेवटच्या माणसापर्यंत हे शिक्षण पोहोचलं पाहिजे हे वेगळं सांगायला नको.

तरीही, भारतात सरकार उच्च शिक्षणाच्या समान संधी गरिबांसाठी नाकारून आपल्या संविधानिक जबाबदारीपासून पळ काढत आहे. एका सरकारी समितीने स्वीकारले आहे की १७ ते २३ वर्षांच्या वयोगटातील तरूणांपैकी फक्त ८ ते ९ टक्के विद्यार्थ्यांची नावनोंदणी आहे. हे प्रमाण जगभरातील इतर अनेक विकसनशील देशांपेक्षाही कमी आहे. विकसित देशांमध्ये ६० टक्कांपेक्षाही जास्त आहे आणि मेक्सिको, चिली, ब्राजील व थायलंड सारख्या विकसनशील देशामध्येही २० टक्केपेक्षा जास्त आहे.[१८६]

औद्योगिक महासत्ता बनण्याचा गाजावाजा करणारे सरकार ही स्थिती सुधारण्याच्या ऐवजी उलट उच्च शिक्षणावर करण्यात येणाऱ्या नगण्य खर्चात अजूनच कपात करत आहे. परिणामी सरकारी मदतीच्या संस्थांमधील उच्च शिक्षणाची फी वाढली आहे. खाजगी शिक्षणसंस्थांना उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत



परवानगी देऊन त्यांच्यासाठी नफा बनवण्याच एक साधन बनवलं आहे. इतकं की बीए,बीकॉम किंवा एलएलबी च्या पदव्या घेणही सर्वसामान्यांच्या आवाक्याबाहेर झाले आहे. धंदेवाईक अभ्यासक्रमाच्या प्रवेशाच्या नावाखाली तर खाजगी संस्था वाट्टेल तेवढी फी आकारतात. ह्या संस्थांच्या सोयीसुविधाही निकृष्ट दर्जाच्या आहेत. आणि यातल्या बहुतेक पदव्यांना काडीचीही किंमत नाही.

ज्या देशामध्ये बहुसंख्य जनतेला शिक्षण मिळावे यासाठी कोणतीही कळकळ नाही, तो देश ज्ञानाच्या बाबतीत 'महासत्ता' असण्याचा दावा कसा करू शकतो ?

### ३) खालावत चाललेलं दारिद्र्य

देशातल्या बहुसंख्य जनतेला नोकऱ्या नाहीत, आरोग्य सेवा नाही, शिक्षण नाही; तरीही, आपल्या देशातील अहंकारी बुद्धिजीवी रोज प्रबंध लिहित असतात, ज्यामध्ये दाखवलं जातं की देशातील गरिबी कशी हळूहळू कमी होत चालली आहे. ह्यासाठी साम्राज्यवादी जागतिकीकरणाच्या भाटांनी, गरिबीची व्याख्याच अशी केली आहे की अर्धपोटी राहणारा माणूसही गरिबीरेषेच्या वर पोहोचला आहे.

राष्ट्रीय आहार संस्थेच्या प्रमाणानुसार प्रत्येक व्यक्तीने प्रतिवर्षी किमान १५७ किलो धान्याचे सेवन करायलाच पाहिजे. अर्थातच, आरोग्यदायी लोकांसाठीचं सरासरी प्रमाण ह्यापेक्षा खूपच जास्त असणार. तरीही २००४ च्या राष्ट्रीय नमुना सर्वेक्षणानुसार (NSS) त्यावर्षी भारतातील अन्नधान्याचे प्रतिव्यक्ती सरासरी सेवन १४२ किलो होते.[१८७] आणि हे सरासरी होतं, म्हणजे गरीब ह्यापेक्षा कमीच खात असणार.

ह्या आकड्यांना २००५-०६ च्या राष्ट्रीय कुटुंब आरोग्य सर्वेक्षणाद्वारे अजून पुष्टी मिळते. आम्ही प्रस्तावनेत हे आकडे दिलेलेच आहेत, इथे भर देण्यासाठी पुन्हा एकदा देत आहोत. भारतातील तीन वर्षाखालील जवळजवळ निम्मी मुलं (४६%) कमी वजनाची आहेत (वयाच्या मानाने जर वजन कमी असेल तर ते तीव्र आणि दीर्घकालीन कुपोषणाचे द्योतक आहे); ३८% मुलांची वाढ खुंटली आहे (वयाच्या मानाने उंची कमी असणे हे दीर्घकालीन कुपोषणाचे द्योतक आहे); आणि १९% मुलं क्षीण आहेत (उंचीच्या मानाने वजन कमी असणे हे तीव्र कुपोषणाचे द्योतक आहे). संयुक्त राष्ट्र संघाचे 'अन्न अधिकारा'चे विशेष दूत जीन झेगलर,



सप्टेंबर २००६ मध्ये दु:खदपणे म्हणाले: “भारतात जगातील सगळ्यात जास्त कुपोषित लोक आहेत आणि कुपोषित मुलांच प्रमाणही सगळ्यात जास्त आहे.”[188]

## ४) तरीही अन्नधान्यावरील अनुदानात कपात

देशातील दारिद्र्याची परिस्थिती खरंतर देशासाठी राष्ट्रीय आणीबाणी आहे. पण बकासुरांना त्याची काहीच खंत नाही, त्यांना फक्त त्यांचा शिधा पाहिजे. जागतिक बँकेने अन्नधान्यावरील अनुदाने कमी करण्यास सांगितले आहे. ह्याच्या समर्थनार्थ त्यांनी असा तर्क दिला की अनुदानाचा मोठा हिस्सा मध्यमवर्गच बळकावतो, आणि म्हणून सार्वजनिक वितरण व्यवस्थेने गरजू लोकांना शोधून काढून त्यांनाच अनुदानित दराने अन्नधान्य पुरवठा करायला हवा. सार्वजनिक वितरण व्यवस्था ही देशातील लाखो भुकेल्या लोकांना अन्नधान्य पुरवण्याची सरकारकडे असलेली एकमेव व्यवस्था आहे. अन्नधान्य महामंडळ (Food Corporation of India किंवा FCI) व सार्वजनिक वितरण व्यवस्थाही बंद करावी अशी जागतिक बँकेची शिफारस आहे.[१८९] भारतीय शासक कर्तव्यतत्परतेने आज्ञापालन करत आहेत.

## ‘लक्ष्यकेंद्री’ सार्वजनिक वितरण व्यवस्था

ह्याचं पहिलं पाऊलं म्हणून सरकारने १९९६ साली ‘लक्ष्य केंद्री’ सार्वजनिक वितरण व्यवस्था सुरू केली. याद्वारे ‘दारिद्र्यरेषेखालील’ आणि ‘दारिद्र्यरेषेवरील’ अशी कुटुंबांची दोन वर्गवारी करण्यात आली आणि दोघांना वेगवेगळी रेशनकार्ड देण्यात आली. २००० साली दारिद्र्यरेषेवरील लोकांसाठी अन्नधान्याच्या किंमती बाजारभावांएवढ्या वाढवण्यात आल्या. परिणामी, ह्या कुटुंबांनी सार्वजनिक वितरण व्यवस्थेतून अन्नधान्य घेणे बंद केले.



पण ह्याचा अर्थ असा नाही की सर्व गरीब कुटुंबांना दारिद्र्यरेषेखालील कार्ड मिळाले. सरकारच्या राष्ट्रीय नमूना सर्वेक्षणानुसार ग्रामीण भागातील ७०.५% कुटुंबांना एक तर कार्डच मिळाले नाही किंवा दारिद्र्यरेषेवरील कार्ड मिळाले आहे - आणि प्रत्यक्षात मात्र ८७% ग्रामीण कुटुंबांना दोन वेळेचं अन्नदेखील मिळत नाही![१९०] सरकारने ठरवून दिलेल्या दारिद्र्यरेषेच्या खाली म्हणजे दरडोई दर महिना ३६५ रुपयांपेक्षा कमी उत्पन्न असलेल्यांपैकी बहुसंख्यांना पण



दारिद्र्यरेषेखालील कार्ड मिळालेले नाही.[१९१] सार्वजनिक वितरण व्यवस्था संपुष्टात आणण्यासाठीच तिला ‘लक्ष्य केंद्री’ बनवलं आहे हे स्पष्टच आहे.

बहुसंख्य गरीब जनता सार्वजनिक वितरण व्यवस्थेतून अन्नधान्य खरेदी करत नसल्यामुळे भारत सरकारजवळील अन्नधान्याचा साठा वाढला – डिसेंबर १९९७ मधील १८७ लाख टन वरून जुलै २००२ ला तो ६३० लाख टन एवढा झाला.[१९२] अशाप्रकारे कृत्रिमरित्या अन्नधान्याचा मोठा साठा निर्माण करून सरकारने घोषित केलं की अन्नधान्याचं अतिउत्पादन झालं आहे. आणि म्हणून सरकारने धोरणात बदल करून अन्नधान्य उत्पादनाच्या वाढीला परावृत्त करून शेतकऱ्यांना भाज्या, फळे, फुले इ.च्या उत्पादनावर भर देण्यास प्रवृत्त केले - साम्राज्यवाद्यांचा भारतासाठी आखलेला कार्यक्रम![१९३]



## राखीव साठा कमी करणे

जरुरीपेक्षा जास्त साठा झाला आहे, म्हणून सरकार आता निर्यात वाढवण्याच्या मागे लागली : एप्रिल २००० ते नोव्हेंबर २००३ च्या दरम्यान, सार्वजनिक वितरण व्यवस्थेतील एकूण २४८ लाख टन गहू आणि तांदूळ सवलतीच्या दरात निर्यात केला गेला - गहू रु.४१५० प्रति टन (किंवा रु.४.१५ प्रति किलो), आणि तांदूळ साधारण रु.५६५० ते रु.६००० प्रति टन (किंवा रु.५.६० ते ६.०० प्रति किलो), म्हणजे दारिद्र्यरेषेवरील कार्डधारकांना मिळणाऱ्या किंमतींपेक्षा कितीतरी कमी दरात! एका अंदाजाप्रमाणे निर्यातदारांना एकूण १३ ते १५ हजार कोटी रुपयांची सवलत मिळाली.[१९४]

देशातील कोट्यवधी जनता उपाशी असताना, सरकार त्यांना सवलतीच्या दरात अन्नधान्य देवू इच्छित नाही. पण बेशरमपणे सवलतीच्या दरात अन्नधान्याची निर्यात करते! जागतिक बँकेला ह्या अनुदानाबद्दल आक्षेप नाही. ‘मुक्त व्यापारा’ बद्दल चाललेली सगळी बडबड हे फक्त एक ढोंग आहे.

वादातीतपणे ही लोकांविरोधात केलेली गुन्हेगारी आहे. या देशातील शासकांनी या देशाच्या सामान्य जनतेशी असलेली आपली नाळ तोडली आहे, हे स्पष्टच आहे. ते देशद्रोही झाले आहेत.

## आणि शेवटी अन्नधान्याची आयात

ह्या विश्वासघाताची गोष्ट इथेच संपत नाही. आता सरकारने, जागतिक बँकेच्या पुढच्या अटी लागू करण्यास सुरुवात केली आहे - भारताचे अन्नधान्य महामंडळ बंद करणे. अन्नधान्याची निर्यात आणि खाजगी व्यापारांना स्वस्त दरात विकल्यामुळे भारत सरकारचा अन्नधान्याचा साठा खूपच वेगाने कमी झाला होता. १ एप्रिल २००२ च्या तुलनेत २६० लाख टनांनी घसरून तो २००५ मध्ये फक्त ४० लाख टन एवढांच राहिला होता. १ एप्रिल २००५ ला तो न्यूनतम आवश्यक साठ्यापेक्षा १ लाख टन कमी होता. तरीही, सरकारने २००५-०६ मध्ये खाजगी व्यापारी कारगिल, आय.टी.सी. सारख्या MNCs ना शेतकऱ्यांकडून शेतमाल थेट खरेदी करण्याची परवानगी दिली, तर दुसऱ्या बाजूला FCI ने जाणून बुजून अन्नधान्याची खरेदी करणे टाळले. २००६ साली गव्हाचे उत्पादन २००५ पेक्षा जास्त असताना, FCI ने २००६ मध्ये, २००५ च्या १४८ लाख टनापेक्षाही कमी गहू खरेदी केला - फक्त ९२ लाख टन. २००० साली, उत्पादन २००६ एवढेच असतांना, FCI ने २०६ लाख टनची खरेदी केली होती! परिणाम अपेक्षितच होते : FCI च्या स्थापनेपासून कदाचित पहिल्यांदाच खाजगी व्यापाऱ्यांकडे सरकारपेक्षा जास्त गहू होता.[१९५]



सरकारला आता गव्हाच्या आयातीसाठी सबब मिळाली. सार्वजनिक वितरण व्यवस्था आणि सरकारच्या इतर कल्याणकारी योजनांसाठी लागणाऱ्या गव्हामध्ये १०० लाख टनाची कमतरता होती. २००६ मध्ये सरकारने ५५ लाख टन गहू आयात केला होता. आंतरराष्ट्रीय धान्य विक्रेत्यांनी, जे 'गट' बनवून धंदा करतात, त्यांनी भारत सरकारचे हात पिरगळायला सुरुवात केली. त्यांनी आयात केलेल्या गव्हामधील कीटकनाशकांचे प्रमाण, कीटक वगैरेंबद्दलचे मानक शिथिल करायला सरकारला भाग पाडले. इतकंच नाही तर किंमतीही वाढवल्या. सरकारला ह्या आयात केलेल्या निकृष्ट गव्हाची सरासरी किंमत रु.९२८७/- प्रतिटन एवढी पडली. त्यावर्षी सरकारने भारतीय शेतकऱ्यांना रु.६५००-७०००/- प्रतिटन भाव दिला होता.[१९६] २००७ मध्ये तर सरकारने ह्याही पेक्षा जास्त भावाने गहू आयात केला, रु.१५,००० प्रति टन[१९७]





ही कहाणी सुद्धा इथेच संपत नाही. आयात केलेला गहू सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत वितरणासाठी होता. पण तो इतका निकृष्ट दर्जाचा होता की त्यावर खूपच आरडाओरडा झाला आणि शेवटी सरकारला त्याचे वितरण थांबवावे लागले. महाराष्ट्रामध्ये राज्य सरकारने ३१००० टन गव्हाचे वितरण ६ महिने थांबवले, आणि शेवटी नाईलाजाने २००८ मध्ये त्यापैकी १८००० टन गहू खरेदीच्या निम्म्या भावात म्हणजे रु.६.७० ने जनतेला विकला आणि १२००० टन गहू कोंबड्यांना खाद्य म्हणून विकला, तर १००० टन गहू इतका वाईट होता की तो जनावरांनाही खायला देण्याच्या लायकीचा नसल्यामुळे गाडून टाकला. ३१००० टन गहू ३ लाख लोकांना वर्षभरासाठी पुरला असता![१९८]

## ५) पाण्याचे खाजगीकरण, भले काहीही होवो!

भांडवलाला नीतिमूल्य नसते. त्यांच्या नफा कमावण्याच्या लालसेला कुठलीही 'लक्ष्मणरेषा' माहीत नाही. माणसाला जगण्यास आवश्यक असणाऱ्या मूलभूत गोष्टींवर ताबा मिळवणे आणि त्यांना अवाढव्य नफा कमावण्याचं (सुपर प्रॉफिट) साधन बनवणे हे त्यांच सर्वोच्च स्वप्न आहे.

दुर्दैवाने, आपण श्वास घेत असलेल्या हवेचं 'खाजगीकरण' करण्याचा कुठलाच मार्ग अजून त्यांना सापडला नाहिये. पण, जगभरातील पिण्याच्या पाण्याच्या पुरवठ्यावर ताबा मिळवून त्याचं व्यावसायिकरण करून नफा कमावण्यात मात्र ते यशस्वी होत आहेत.

१९९० च्या दशकात लॅटीन अमेरिकेत मोठ्या प्रमाणात पाण्याचं खाजगीकरण झालं. युरोपमधील पाण्याच्या MNCsनी अनेक देशांमधील पिण्याच्या पाण्याचा पुरवठा ताब्यात घेतला आणि पाण्याच्या किंमती कित्येक पटींनी वाढवल्या. ह्यामुळे लोकांची एक मजबूत चळवळ उभी राहीली. त्यांनी ह्या पाण्याच्या MNCs ना लॅटीन अमेरिकेच्या बाहेर हाकलून काढले.[१९९] पाण्याच्या खाजगीकरणामुळे द.आफ्रिकेमधील डॉल्फीन समुद्रकिनाऱ्यालगतच्या भागामध्ये १९९८ मध्ये कॉलराची एक ऐतिहासिक साथ आली, ज्यामध्ये २५,००० लोक आजारी पडले. लाखो गरीब लोकांना वाढलेल्या भावाने पाणी घेणं परवडणं शक्य नव्हतं, आणि म्हणून त्यांना तळी, डबकी आणि नाले ह्यामधील माणसांच्या वावरण्यामुळे आणि मैल्यामुळे खराब झालेलं पाणी पिणं भाग पडलं.[२००]



तरीही, जागतिक बँकेच्या आदेशामुळे, भारतही आता ह्याच मार्गावर जात आहे. महाराष्ट्रातील चंद्रपूर हे पाण्याचे खाजगीकरण झालेलं पहिलं शहर आहे. तिथे पाण्याचा प्रवाह गरिबांकडून श्रीमंतांकडे वळवायला सुरुवात झाली आहे.[२०१] मुंबईमध्येही ह्याच्या एका 'चाचणी प्रकल्पा'ला सुरुवात झाली आहे : पाण्याच्या खाजगीकरणाची नांदी.[२०२] २००५ साली दिल्ली सरकारने गुपचुपपणे पाण्याच्या वितरणाचे खाजगीकरण करण्याचा प्रयत्न केला. माहितीच्या अधिकाराखाली हे प्रकरण बाहेर आणले गेले, आणि दिल्लीतील रहिवासी सोसायट्यांमधून लोकांनी ह्याविरूद्ध आंदोलन छेडले. सरकारला हा प्रस्ताव मागे घ्यायला लागला, आणि ह्या प्रकल्पाला स्थगिती द्यावी लागली; जागतिक बँक, जी तोपर्यंत या प्रकल्पावर देखरेख करत होती, तिने लगेच जाहीर केले की ती पूर्वीपासूनच ह्या प्रकल्पाच्या विरोधात होती![२०३]

भारतामध्ये खराब पाण्यामुळे पसरले जाणारे आजार खूप मोठ्या प्रमाणात आहेत. गरिबांसाठी आधीच दयनीय असलेल्या पाणीपुरवठ्यात खाजगीकरणामुळे गंभीर संकट कोसळेल.

"तुम मुझे खून दो, मैं तुम्हें आजादी दूंगा". स्वातंत्र्यसेनानी सुभाषचंद्र बोस ह्यांनी दिलेल्या हाकेला त्यावेळी लाखो लोकांनी प्रतिसाद दिला. त्यावेळी त्यांना जरा सुद्धा शंका आली नसेल की स्वातंत्र्यानंतर फक्त ५० वर्षांत दिल्लीचे राजे त्याच लुटारू कंपन्यांना आपल्या देशाचा नाश करण्यासाठी, आपली नैसर्गिक साधन संपत्ती लुटून नेण्यासाठी, आपल्याच लोकांच्या रक्ताचे शेवटच्या थेंबापर्यंत शोषण करून त्याचे 'डॉलर' बनवण्यासाठी परत बोलावतील.

## ६) महागाई

२००८ च्या मध्यात सामान्य माणसाला अजून एका भूताने पछाडले होते - ते म्हणजे महागाई. ही दोन आकड्यांवर जाऊन पोहोचली आणि अनेक महिने तिथेच स्थिर राहीली. तांदूळ, गहू, ज्वारी, खाद्यतेले, तूरडाळ, साखर, भाज्या, दूध, औषधे, डीझेल-पेट्रोल, कापड आणि इतर अत्यावश्यक वस्तूंचे भाव आभाळाला भिडले आहेत.



महागाई गरिबांकडून श्रीमंतांकडे संपत्ती वळवते. श्रीमंतांना फायदा होतो, कारण वाढत्या किंमतींमुळे त्यांचा नफा वाढतो. पण गरीब मात्र ह्यात भरडला



जातो, विशेषत: प्रचंड मोठ्या संख्येने असलेले असंघटित क्षेत्रात काम करणारे कामगार, ज्यांचं उत्पन्न महागाईवर आधारित नसतं. महागाई वाढल्यावर त्यांची खरेदीची क्षमता कमी होते. संघटित क्षेत्रात काम करणाऱ्यांना पगारात थोडीशी वाढ तर मिळते, पण वाढलेल्या किंमतीसाठी पुरेल एवढी नाही.

महागाई ही भांडवलशाही व्यवस्थेचा अविभाज्य परिणाम आहे. १९६० ते २००६ या काळात, भारतातील वस्तूंच्या किंमती २८ पट वाढल्या.[२०४] पण अलिकडे झालेली प्रचंड भाववाढ ही नवीन आर्थिक धोरणांचा म्हणजेच जागतिकीकरणाचा परिणाम आहे. त्यातले काही महत्त्वाचे घटक खाली दिले आहेत.

• **सट्टेबाज भांडवलाची आवक:** सट्टेबाज भांडवलाचा प्रवाह गेल्या काही वर्षात खूप उंचावत गेला आहे. आपल्या देशात येणाऱ्या डॉलर्सची रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, रुपयांशी देवाणघेवाण करते, त्यासाठी नोटा छापते. त्यामुळे अर्थव्यवस्थेतील पैशांचा पुरवठा वाढतो. पण त्याचप्रमाणात कुठल्याही प्रकारे उत्पादनात वाढ न झाल्यामुळे, अर्थव्यवस्थेतील ही प्रचंड पैशाची वाढ हे महागाईचं एक महत्त्वाचं कारण आहे.

• **शेती व्यवस्थेचा विध्वंस:** साम्राज्यवादी, भारतीय शेतीव्यवस्थेवर ताबा मिळवून भारताची अन्नधान्याची सुरक्षितता नष्ट करण्यात यशस्वी होत आहेत. भारताचे दरडोई अन्नधान्याचे उत्पादन १९४०च्या दशकापेक्षाही कमी झाले आहे. अन्नधान्याच्या उत्पादनात झालेली ही प्रचंड घट अन्नधान्याच्या किंमती वाढवण्यास जबाबदार आहे.

• **सार्वजनिक वितरण व्यवस्थेचा नाश**: ह्याबरोबर, संपूर्ण देशभरातील सार्वजनिक वितरण व्यवस्था मोडून टाकण्यात आली आहे. सरकार सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या माध्यमातून गरिबांना तांदूळ, गहू, साखर आणि रॉकेल सारख्या जीवनावश्यक वस्तू स्वस्त दरात देत होते; ह्यामुळे सरकारला बाजारभावावर नियंत्रण ठेवणे पण शक्य होत होते. आता सरकार, सार्वजनिक वितरण व्यवस्थेसाठी शेतकऱ्यांकडून जे अन्नधान्य खरेदी करत होते, त्यात कपात करत आहे, आणि खाजगी व्यापाऱ्यांना आणि मोठमोठ्या शेतकी कंपन्यांना थेट शेतकऱ्यांकडून शेतमाल विकत घेण्यास परवानगी देत आहे. अन्नधान्याच्या किंमतींवर नियंत्रण ठेवण्यासाठी सरकार आता स्वत:च्या अन्नधान्याच्या साठवणुकीचा उपयोग करत नाही. दुसऱ्याबाजूला शेती उद्योगातील महाकाय कंपन्याकडे अन्नधान्याचा प्रचंड मोठा साठा जमा झालेला आहे. हव्या त्या किंमतीला विकायला आता ते मोकळे.

**• अत्यावश्यक सेवांच खाजगीकरण:** सरकार फक्त कल्याणकारी योजनांवरचा खर्चच कमी करत नाही, तर सर्व अत्यावश्यक सेवा उदा. आरोग्य, शिक्षण, वीज, पिण्याचे पाणी ह्या सगळ्याचं खाजगीकरणही करत आहे. परिणामी ह्या सगळ्यांच्या किंमती वाढत आहेत. त्याचा सर्वसामान्यांवर गंभीर परिणाम होत आहे. ह्याचं उदाहरण द्यायचं झालं तर वैद्यकीय खर्च हे भारतीय शेतकऱ्यांच्या वाढत्या दिवाळखोरीचं एक महत्त्वाचं कारण आहे ज्यामुळे ते आत्महत्या करत आहेत.

## (ग) बड्या कंपन्यांची मालकी, भारत प्रायव्हेट लि....

भारतीय धनदांडग्यांना जगातल्या धनदांडग्यांमध्ये सामील व्हायची भलतीच घाई झाली आहे. पाश्चिमात्य धनदांडग्यांना नैसर्गिक संपत्तीची नासधूस करायला आणि लोकांना गुलाम बनवायला वसाहती होत्या. भारतीय धनदांडगे आपल्याच देशातील लोकांना गुलाम बनवत आहेत. बळजबरीने देशाची नैसर्गिक संपदा बळकावत आहेत – कोळसा, बॉक्साईट, लोखंड, पाणी, इ.इ. त्यांना जमिनीही हव्या आहेत, गोल्फ मैदाने बनवण्यासाठी, टुमदार घरे बांधण्यासाठी, मोटारींचे कारखाने सुरू करण्यासाठी. आणि त्यासाठी त्यांनी जनतेवर हल्लाबोल सुरू केले आहे. सर्व प्रकारच्या हत्यारांचा वापर केला जात आहे - मैत्रीपूर्ण न्यायालयीन आदेश, मैत्रीपूर्ण राज्यकर्ते, मैत्रीपूर्ण प्रसारमाध्यमे आणि गोळ्या झाडायला उत्सुक मैत्रीपूर्ण पोलीस फौज.



छत्तीसगड, ओरिसा, झारखंड मधल्या हजारो आदिवासींना जबरदस्तीने त्यांच्या खनिजसंपन्न जमिनींवरून हाकललं जात आहे. गावच्या गावं उद्ध्वस्त केली जात आहेत.[२०५] इतकी हिंमत तर इंग्रजांचीही झाली नव्हती जितकं हे नवीन वसाहतवादी आदिवासींना उद्ध्वस्त करत आहेत.

त्यांच्या पुनर्वसनाचे काय? भारतातील काळे शासक हे गोऱ्या कातडीच्या वसाहतवाद्यांचे खरे अनुयायी आहेत. अगदी आत्तापर्यंत सरकार जमिनी हडप करण्यासाठी इंग्रजांच्या काळातील १८९४ चा जमीन धारणा कायदा (१९८४ साली सुधारित) वापरत होती. प्रक्रिया सोपी होती - जमिनी 'सामाजिक उद्देशासाठी' हव्या आहेत एवढांच दावा करायचा होता. आणि ह्या 'सामाजिक उद्देशाची' व्याख्या कॉर्पोरेटस्ना जमिनी देण्यासाठीही ताणली जाऊ शकत होती. आता



२००७ मध्ये सरकारने जमीन धारणा कायद्यात सुधारणा करण्याचा प्रस्ताव आणला आहे - ह्या बनवाबनवी फक्त वेगाने पुढे जाव्यात म्हणून नाही तर ह्या कायदेशीर व्हाव्यात म्हणूनही.[२०६] जुन्या कायद्यानुसार आणि प्रस्तावित नवीन कायद्यानुसारही सरकारला विस्थापितांसाठी नुकसानभरपाई म्हणून पैशांशिवाय काहीही देण्याची गरज नाही.

कल्पना करा. बहुतेक आदिवासी आणि लहान शेतकरी ह्यांना नुकसानभरपाई म्हणून मिळणारे पैसे म्हणजे सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांना एक खतांच पोत दिल्यासारखं आहे. असंही, बहुतांश आदिवासींना नुकसानभरपाई देण्याची गरजच नाही, कारण त्यांच्याकडे त्यांच्या जमिनींचा सातबाराचा उताराच नसतो. त्यामुळे आदिवासी जनता पिढ्यान पिढ्या या जमिनींवर राहत असली तरी, सरकारच्या दृष्टीने त्यांनी अतिक्रमण केलं आहे. आणि सरकार त्यांना हुसकावून लावत आहे. थोडेफार नुकसानभरपाईसाठी पात्र ठरतात. कलिंगनगरमध्ये, ह्या थोड्यांना जमिनींसाठी रु.३५,०००/- नुकसानभरपाई म्हणून मिळाले, जी जमीन नंतर ३.५ लाख रुपयांना विकली गेली आणि ज्याचा बाजारभाव तर ह्याहीपेक्षा जास्त होता.[२०७] ह्यालाच अर्थशास्त्रात 'मुक्त बाजार' म्हणतात.

हे विस्थापन फक्त ह्या आदिवासी राज्यांमध्येच होत आहे असं नाही. हे सगळीकडेच घडत आहे. मग ते नर्मदेवरचं धरण असो, अथवा बंगलोरचा आय.टी. पार्क असो, अथवा दिल्लीतील शॉपिंग मॉल असो, अथवा मुंबईच शांघाय बनवायचं असो, अथवा कोलकाताच सुंदरीकरण असो, पहिलं पाऊल टाकलं जातं गरिबांच्या जमिनी बळकावण्यासाठी. बुलडोझर येतो आणि गरिबांची घरं जमिनदोस्त करतो.



नक्की किती विस्थापित झाले? कोणास ठाऊक. अर्थव्यवस्थेमध्ये घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीच्या आकडेवारीची नोंद सरकारकडे असते. पण 'राष्ट्रीय विकासाच्या' नावाखाली मोठमोठ्या प्रकल्पांद्वारे किती विस्थापित झाले ह्याची आकडेवारी मात्र सरकारकडे नाही. हे आश्चर्यकारक नाही का? किंमत कळल्याशिवाय विकास मोजणारच कसा? प्रत्यक्ष उत्पादन खर्च विचारात न घेताच बाजारात सिमेंट, स्टील, वीज किंवा रस्ते ह्यांची किंमत कशी ठरू शकते?

लाखोंच्या संख्येने लोक विस्थापित होत आहेत, हे मात्र नक्कीच. विस्थापित झाल्यानंतर त्यांच काय होत आहे? ते कुठे जातात? ते कसे राहतात? कोणालाच माहित नाही. त्यांचं आता अस्तित्वच नाही.

ह्यातले बहुतांश लोक शहरातल्या गलिच्छ झोपड्यांमध्ये येऊन पोहोचतात, अतिशय अपमानजनक आणि अमानवीय परिस्थितीत काम करतात. त्यांना गॅस चेंबरमध्ये ढकललं गेलं नाहीये हे खरं, पण त्यांची परिस्थिती हिटलरच्या 'कॉन्सेंट्रेशन कॅम्प' पेक्षा फार वेगळी नाही.

हे भयानक स्वप्नं इथेच संपत नाही. जेव्हा श्रीमंतांना रस्ते, उड्डाणपूल, बागा, सिनेमाहॉल बांधायचे असतात, तेव्हा गरिबांना त्यांच्या त्या भयानक गलिच्छ वस्त्यांमधून सुध्दा उखडलं जातं...

मुंबईच शांघाय बनवण्यासाठी पहिला बुलडोझर फिरतो तो गरिबांच्या झोपडपट्ट्यांवरून. त्यांच्या पुनर्वसनाचा दिखावाही केला जात नाही. २००४-०५ च्या पाशवी झोपडपट्टी निर्मूलनामध्ये ४ लाख लोकांची घर जमिनदोस्त करण्यात आली; कदाचित आणखी लाखो लोकांच्या नशीबी हेच आहे. त्याचप्रमाणे शहरातील ३ लाख फेरीवाल्यांनाही उठवण्यात येत आहे, त्यापैकी फक्त १७,००० जणांना पर्यायी जागा देण्याचा प्रस्ताव आहे. शहरं फक्त श्रीमंतांसाठी आरक्षित केली जात आहेत. २००४-०५ मध्ये झालेल्या उच्चाटनात ४ लाख लोकांना आपली घरं गमवावी लागली; मुंबईच शांघाय बनवण्यासाठी आणखी दहा एक लाखांच्या नशीबी सुद्धा हेच 'भाग्य' आहे. त्याचप्रमाणे शहरातील ३,००,००० फेरीवाल्यांनाही हाकलून देण्यात आलं आहे, आणि त्यापैकी फक्त १७,००० फेरीवाल्यांचं विशेष क्षेत्रामध्ये पुनर्वसन करण्यात येणार आहे.[२०८] फक्त विकास महत्वाचा. त्यांच्याकडे स्थावर मालमत्तेत गुंतवणूक करण्यासाठी पैसा आहे, पण त्यांना जमिनी हव्या आहेत... मग देशाच्या विकासासाठी गरिबांनी थोडा त्याग नको करायला?

या देशात आता फक्त श्रीमंतांनाच राहण्याचा अधिकार आहे. उच्च वर्ग उर्वरित देशापासून विभक्त झाला आहे. हे अशा प्रकारचं विभाजन आहे जिथे थोडेसे लोक बहुसंख्यांच्या जमिनी, नद्या, पाणी, स्वातंत्र्य, सुरक्षितता, स्वाभिमान, मूलभूत अधिकारसुध्दा ओरबाडून घेऊन गब्बर झाले आहेत.

**GDP चा विकासदर हा गरिबांसाठी अभद्र शब्द बनला आहे. श्रीमंत त्यांच्या संपत्तीची वाढ GDP च्या वाढीच्या दरामध्ये मोजतात, पण**



**बहुसंख्यांसाठी मात्र ते त्यांच्या आयुष्याच्या उद्ध्वस्तीकरणाचं परिमाण...**

## भाग आठ
# दुसऱ्या स्वातंत्र्याच्या लढ्यासाठी

प्रिय मित्रांनो,

आपला देश गंभीर संकटात आहे. देशाच्या शासकांनी धनदांडग्यांच्या नफ्यासाठी देशाचं सार्वभौमिकत्वसुद्धा गहाण टाकलं आहे.

**लोक लढत आहेत...**

स्वत:च्या उन्नतीच्या या भयानक नाटकाचे, लोक मूक साक्षीदार नाहीयेत. देशभरात सगळीकडे ह्याच्या विरुद्ध संघर्ष करत आहेत. बियाणांची मक्तेदारी, पिकांमध्ये केलेले जनुकीय बदल, परदेशी शेतकी बहुराष्ट्रीय कंपन्यांची आपल्या देशाच्या शेतीक्षेत्रात घुसखोरी, कमी होत असलेली शेतीवरील अनुदाने, ह्या सगळ्याच्या विरोधात शेतकरी संघर्ष करत आहेत. वित्तीय क्षेत्रांत होणाऱ्या सुधारणांच्या विरोधात वेळोवेळी बँक आणि विमा कर्मचाऱ्यांनी निदर्शने, संप पुकारला आहे. फी वाढीच्या विरोधात विद्यार्थी रस्त्यावर उतरले आहेत. स्त्रियाही आपल्या हक्कांसाठी रस्त्यावर उतरून मोर्चे काढत आहेत. देशभरातील असंघटित क्षेत्रांतील कामगार संघटित होत आहेत. हजारोंच्या संख्येने संघटित कामगारांनी कामाच्या ठिकाणची परिस्थिती सुधारण्यासाठी दिल्लीमध्ये गेल्या वर्षी (२००८) एप्रिलला संप केला. राजस्थान आणि दिल्ली पासून तामिळनाडू ते केरळ पर्यंत लोक पाण्याच्या खाजगीकरणाच्या विरोधात रस्त्यावर उतरले आहेत. नवीन धोरणांमुळे ज्यांच्या जीवनसाधनांवर घाला घातला जात आहे असे लाखो कोळी



